सुरस ग्रंथमाला पुष्प १२१

# हिरवा चुडा

कु. डॉ. सरोजिनी बाबर
एम. ए. पीएच. डी.

प्रथमावृत्ति १९५२ ] [ किंमत २ रुपये

सुरस ग्रंथमाला - पंढरपूर.

प्रकाशक :
सुरसग्रंथमाला, पंढरपूर



: मालक :
राजेंद्र रावजी शहा
महाद्वार–पंढरपूर



: संचालक :
नवजीवन गौतमचंद व्होरा
केमिस्ट, सोलापूर



चित्रकार रघुवीर मुळगांवकर



पुढील आवृत्तीचे हक्क लेखिकेकडे



मुद्रक :
बाळकृष्ण भाऊ जोशी
ज्ञानविलास प्रेस,
२७ बुधवार, पुणें २.

माझी

थाकटी बहीण

चि. कुमुदिनी हीस



# : १ :

" आत्याबाई ऽऽऽ अग मी आलें ! ही बघ लौकर आले की नाही ती ! अं ! कुठं आहेस ग तू ? "

धावत पळत वाड्यांत शिरताना पायांत अडकलेलं पातळ खालीं वाकून बाजूला सारीत राधिकेनं मोठ्या उत्सुकतेनं आजूबाजूला डोकावून पाहिलं. इतक्यांत गोठ्यातून शेवंती आक्कांचा आवाज आला, " आर कोन हाय ? "

" अगबाई ! धार काढते आहे वाटतं ही अजून ? " आनंदानं टाळ्या पिटीत राधिका गोठ्याकडे धांवली. तिचा कयास खरा ठरला. दोन्ही गुड-घ्यामध्ये कासांडी ठेवून दोन्ही हातांनीं शेवती आक्का धार काढीत होत्या. राधिका चटकन् पुढं झाली आणि त्याच्या गळ्याशीं पडत कुजबुजली, " आले की नाही लौकर ? "

" कोन, राधे ? कवा ग आलीस ? " शेवंती आक्काचा आनद राधि-केला बघून वर उसळला हातांतील दुधाची कासाडी तशीच राधिकेच्या तोंडाला लावीत त्यानी तिला जवळ ओढली आणि म्हटल, "एवढ्या लौकर कशी ग आलीस ? आन् सग कोण आलय् ?आई बी आली ? "

" अं ह ! एकटी आले ! " काही तरी विशेष पराक्रम गाजवल्याच्या रुबाबात राधिकेन शेवती आक्काच्याकडे अभिमानान पाहिल आणि तोंडाला लागलेला दुधाचा फेस पदरान पुशीत म्हटल, " तुला सोडून रहा-यचं म्हणजे भारी जड जात बाई मला तरी ! आजी रहा म्हणाली, आईनं पुष्कळ आग्रह केला; पण मी आले. "

" बेस झाल. हित मला तरी कवा गमतया ? सार घर अक्षी खायाला उटतया म्हनीनास तू गेल्यापसन ! बरीं हाईतीं सारी ? "

" चांगली आहेत की ! "

" असू द्यात. कुनाचं बी चांगलच चालावं. बरं, तू आलीस ग कुनासंग ? एकटी कशी येशील ? "

" का ? लाब आहे फार, की अवघड आहे ? "

" न्हाई, तरनी ताटी पोरगी, एकली लावून कोण ग दील पोरी ? आपल्या गांवचं कोण आलंया वाटतं सोबतीला ? "

" गांवचं ? नाहीं बाई ! पण...."

" मग कोन आजूळचं आलंया संग घालवीत ? "

"अं हं ! झेल्याच्या मास्तरांच्या बरोबर आलें! " राधिकेनं बोलतां बोलतां जीभ चावली.

" झेल्याचा मास्तर ? कोण ग ? " शेवंती आक्कांच्या कपाळावर आठ्या चढल्या. त्यामुळं राधिका थोडी चपापली. इकडे तिकडे उगाचच पाहिल्यासारखं करीत तिनं सांगून टाकलं, " आपल्या किसनचे पण मास्तर तेच कीं ग ! त्यांना यायचं होतंच शाळेसाठीं, तेव्हां आजीनं मला पाठवलं त्यांच्या बरोबरच. अगदी घरापर्यंत आणून सोडल ना त्यांनी ! "

" व्हय का ? आंत तरी बोलवायच न्हाईस त्येला ? बघितला तरी असतां कोण हाय त्यो ! " शेवती आक्का थोड्या ठसक्यानं म्हणाल्या आणि दुधाची कासांडी बरोबर घेऊन घरांत यायला निघाल्या. राधिकेनं त्यांच्याकडे थोडे रोखून पाहिलं आणि पदराचं टोक दांताखाली धरीत विचार केला, ' हिचं काय बिघडलं त्यांत ? वघा बाई ! म्हणजे हिच्या-साठीं आजोळीं न रहातां धावत पळत आलें तर हिला राग आला ! मास्तर म्हणजे काय राक्षस की लफंग्या म्हणून एवढ्या ठसक्यानं उठून गेली ही ? '

शेवंती आक्कांच्या या वागण्यामुळं राधिका कष्टी झाली. तिच्या तोंडावरचा मघाचा आनंद मावळला. ती गभीर झाली आणि झपझप घरांत जाऊन तिनं शेवंती आक्कांना विचारलं, " रागाला आलीस ? "

" रागाला कशाला येतीया ? खुळ लागलंय् व्हय मला ? " राधिकेनं धरलेला हात सोडवून घेत शेवती आक्कानी उसासा टाकला.

" रागाला नाही आलीस, तर मग अशी तडकाफडकी निघून आलीस ती मास्तरांच्या बरोबर आलें म्हटल्याबरोबर ?"

" मग ? आरती ववाळू म्हनतीस ? तरनी ताठी पोरगी तू आन् खुशाल आलीस त्या मास्तराच्या संगं ? कुटला कोण त्यो, वळकीचा का पाळकीचा ? आन् ही भवानी आली की आपली त्येच्या संगं ! माणसं तरी काय म्हणत्याती ? " शेवती आक्कांचा राग उफाळून वर आला. तोंडाला येईल तें त्यांनीं बडबडायला सुरवात केली, इतक्यांत किसन आणि

झेल्या धांवत येत ओरडले, " आक्का ऽऽऽ आली नव्ह का ग आत्ये आक्का ऽऽऽ" त्यामुळं राधिकेनं चटकन् आपली मान वळवली आणि हंसतमुखानं त्या दोघांना सामोरी जात म्हटलं, " आतां एवढयांत आलें. तुम्हांला रे कुणीं सागितलं ? "

" मास्तरानीं ! " झेल्यान मोठया आनंदानं आपल्या गुरुबद्दलचा आदर व्यक्त केला.

" हो, त्यांच्या बरोवरच आलें. म्हटलं, आहे सोबत अनायासें तर चला; पण आत्याबाईला केवढा राग आला ! "

" तू आलीस म्हणून ? " किसननं आश्चर्यानं आपल्या बहिणीकडे पाहिलं.

" आले म्हणून नाही; पण मास्तरांच्या बरोबर आलें म्हणून ! "

" मग त्यात काय झाल रागावण्यासारख ? " झेल्यानं आपले खांदे उडवले आणि पुन्हा म्हटलं, " मास्तराच्यासारखा माणूस दुनियेंत तरी आहे का ? आमच्या आत्तीनं एकडाव त्याना बघायला पाहिजे. मग तिचा हा राग कुठल्या कुठ पळून जाईल खरच, आत्ये, फार छान आहेत आमचे मास्तर ! "

" मग काय करू म्हनतूस ? " शेवटी आक्कांचा राग अजून शांत झाला नव्हता.

"करायचं नाही ग काही ! त्याच्याबरोवर आक्का आली म्हणून रागाऊं नको एवढच मला म्हणायचय्. " झेल्यानं आपली बाजू पुढं केली तेव्हां किसन त्याला पुष्टी देत म्हणाला,

" आत्ये, शाळेत येतीस का नाहीतर ? "

" कशाला र ? "

" म्हणजे आक्का त्यांच्याबरोबर आली का आजीनं आक्काला त्यांच्या-बरोबर पाठवली ह्याच खर खोट करून टाकू या समोरासमोर ! "

" मर्जी. खर खोट र कशाला ? "

" तुझा राग जाईल ग मग लगेच ! "

" अर, मास्तर तुजा मस्त चांगला असल; पर हिनं त्येच्यासंग कशाला याचं ? पैली वळख तरी हाई हिची? आन त्यों कोन आपला पै का पावना? लोक काय म्हनत्याल ? "

"लोकांच्या बाचं आपून काय खाल्लंया ? " झेल्यानं चमत्कारिकपणें शेवंती आक्कांच्याकडे पाहिलं लोकांचा बाऊ त्यांना का वाटावा हे त्याला कळेना. त्यामुळ तो आणखी कांही बोलू नये व आत्याबाईच्या रागाचा पारा चढू नये म्हणून राधिकेन त्याला गप्प बसायला व शाळेंत निघून जायला डोळ्यानं खुणावल आणि ती माडीवर निघून गेली.

'उठतां बसतां लोक काय म्हणतील ! जसा काही एखादा पवित्र मत्र पाठ केला आहे हिन हा ! किसनबरोबर आणि झेल्याबरोबर देखील शेताला जायचं नाही म्हणे. कां, तर म्हणे आतां त मोठी झालीस म्हणजे जसा काही भयंकर गन्हाच झाला माझ्या हातुन हा मोठ व्हायचा ! ' राधिकेनं हातपाय आपटीतच माडीवरची खिडकी उघडली आणि दाण-कन तिथल्या सतरजीवर आपल अग टाकून दिल आपण उगाच लवकर आलों. तिला पस्तावा होऊ लागला. गेले चार दिवस आजोळी फारच चांगले गेल्याच समाधान एका घटकेत नाहीस झाल्याची तिला जाणीव झाली. मनांतल्या मनात ती फारच नाराज झाली. मनाला येईल तेव्हा उठावं, हव तें खाव प्याव, खुशाल रानोमाळ मामेभावडाच्या बरोबर हसत खिदळत भटकाव मास्तर शेजारच्या घरचे पाहुणे. तेव्हा त्याच्याशी सगळ्यानीच गप्पा माराव्या, त्याच्याकडून खूप गोष्टी ऐकाव्या, शेजारच्या पोरीसोरीबरोबर हवा तितका धिगाणा घालावा; पण कधी कुणी अवाक्षरहि काढल नाही ! आणि इथे आल्याबरोबर लोक काय म्हणतील याची गोष्ट आत्याबाईन काढावी याचो राधिकेला चीड आली आणि तिन मास्त-राच्याबद्दल अप्रत्यक्ष का होईना घेतलेली शंका बघून तर तिच डोक आणखीनच भडकल.

तसं पाहिलं तर राधिकेचा आणि मास्तरांचा परिचय नवीन होता ही गोष्ट खरी. पण या नव्या परिचयांतहि खूप जुने ऋणानुबंध असल्याची साक्ष अनेकदां पटावी इतके मास्तर तिच्याशी अगदी मोकळ्या मनानं वागले होते. सुरवातीला ते राधिकेच्या आजोळी तिच्या मामाच्या बरोबर आले तेव्हां तिच्या आजीनं त्यांना सांगितलं, 'ही आमची नात. राधिका म्हनत्याती हिला. चार बुकं शिकलिया तुमावानीच. कोनचंबी बुक फडाफड वाचतीया लाहया फुटल्यावानी ! ' त्यावर समाधानानं तिच्याकडे पहात

मास्तर म्हणाले, 'वा वा ! फार छान ! शिकलेलीं मुलं मला फार आवडतात.' किती सरळ आणि साधं त्यांच बोलणं ! ते बोलायचे तें देखील मोजकं. गोष्ट सांगायचे ती सुद्धां अगदीं सावकाश आणि आपल्याच नादांत गुग होऊन. आगगाडीतून बरोबर प्रवास केला; पण जवळसुद्धा बसले नाहीत ! उलट 'तुमची मुलगी जशीच्या तशी पोंचती करतों' म्हणून आजीला दिलेलं आश्वासन त्यानी राधिकेशी विशेष न बोलतां जसच्या तस पाळल. कधीं मान वर करून तिच्याकडे बघितलहि नाहीं आणि असं असून त्यांच्याबरोबर आपण आलो म्हणून आत्याबाईनं चिडावं ही कल्पना राधिकेला बरीच बोचली. त्या वेळी या गोष्टीवर विचार करताना तिची अस्वस्थता इतकी वाढली की, तिचा तिलाच विलक्षण राग येऊन ती पुटपुटली, 'वाढत्या वयाबरोबर अंगाला न येणारा कपडा जसा फेकून देता येतो, तस जिथ तिथ 'आ' वासून भीति दाखवणार हे वाढत वय देखील एकेका वर्षानं बाजूला करतां आल असत तर काय बहार झाली असती ! . . .'



: २ :

"छे ! नाही बाई आता तुम्ही काय वाटेल ते म्हणाला तरी मी ऐकायची नाही." नेहमीप्रमाणे विहिरीत उतरल्याबरोबर राधिकेच्या मैत्रिणीनी तिला पोहायचा आग्रह केला असता तिन स्पष्ट नकार दर्शविला. खरं म्हणजे नुकताच सूर्य उगवला आहे, त्याची कोवळीं किरणं विहिरीत डोकावून पहाताहेत, पाण्याचे थेंब त्या प्रकाशाच्या तावडीत सांपडतांच तिथ इंद्रधनुष्याचा दिमाख चमकतो आहे आणि विहीरीवर पोरांची वर्दळ नाहीं, अशा वेळी पोहायचा मोह राधिकेला विलक्षण झाला होता. पण कालपासून ती आपल्या आत्याबाईवर रुष्ट असल्यानं जाणून बुजूनच तिनं मैत्रिणींचं मन मोडायचं असं ठरवून टाकलं होतं आणि त्यासाठींच डाव्या

हाताला असलेल्या विहिरीच्या भितीच्या एका कपारीला गच्च आवळून धरत तिनं आपला उजवा हात मैत्रिणीच्या–शकुतलेच्या–हातातून मोठ्या मुष्किलीन सोडवून घ्यायचा प्रयत्न केला. पण शकुतला वस्ताद होती. तिनं राधिकेचा पदर एका हातानं धरीत तिला आपल्याकडे जोरानं ओढली आणि विहिरीत उडी घेतली !

" अगदीच फाजील आहेस बघ ! " जोरानं पाण्यांत आदळून खोलवर बुडी मारावी लागल्यामुळं वर येताच मान हलवून नाकातोडातील पाणी बाजूला फेकीत राधिकेन शकुंतलेकडे पाहिलं. तेवढ्यात तिचही डोकं पाण्याच्या पृष्ठभागावर आलं. दात विचकून राधिकेकडे पहात शकुंतला म्हणाली, " अजून कशांत काही नाही तोवर इतकी घाई घरी जायची ! उद्या एखाद्याची राणी झाल्यावर बोलशील तरी की नाही कुणाला ठाऊक ! "

" तर तर ! म्हणे बोलशील की नाही कुणाला ठाऊक! लाज वाटते आहे का अस कांही बोलायला ? " राधिका पोहत पोहत पायरीजवळ येऊन तिथं टेकून बसली; पण शकुतलेनं तिला पुन्हा पाण्यात खेचीत म्हटलं, " आत्याबाई रागावते काय नि तू फुगून बसतेस ती काय ! इश्य ! " आणि तिनं राधिकेची टप्पल बसणार या भावनेनं एकदम बुडी मारली. त्यामुळं तिचा शोध करावा म्हणून राधिकेनेहि रागारागानं पाण्यात डोकं खुपसल. पण कुणीच कुणाला सांपडलं नाही. एकीची मान वर यावी नि दुसरीनं नेमकी त्याच वेळी बुडी मारावी असा लपडाव घटकाभर चालला. अखेरीस विहिरीच्या एका टोकाला शकुतला आणि दुसऱ्या टोकाला राधिका पायाखालच्या कठड्यावर उभ्या राहिल्या आणि एकमेकीच्याकडे बघून हंसल्या.

" खरच, अगदी मुलखावेगळी आहेस बघ ! " राधिकेनं दोन्ही हातांच्या ओंजळीनं शकुंतलेवर पाणी शिपडल.

" आणि तू ग? अगदी शहाणी, असंच ना ? " शकुंतलेनंहि राधिकेच्या अंगावर पाणी उडवलं आणि ती पोहत पोहत तिच्याकडे येऊ लागली. पण राधिकेनं ती येत आहे असं दिसताच तिथून पायरीकडे धांव घेतली आणि ती भरभर वर निघून जाऊं लागली.

" चाललीस ग कुठं ? " राधिकेच्या पाठोपाठ शकुंतला आपल्या भिज-

लेल्या साडीच्या ओच्यांतील पाणी पिळून टाकीत एकेक पायरी चढून वर निघाली. त्यामुळं आणखी एकदां ही पाण्यांत खेचील या भावनेनं राधिकेनं मोठ्या चपळाईनं पायांत लुगडं लुडबुडत होतं तरी धूम ठोकली.

" पळून पळून किती पळशील अं ? " शकुतलेनं राधिकेची पाठ सोडली नाहीं. ती ओल्या लुगड्याचे फटकारे पायावर बसत होते तरी तशीच राधिकेच्या पाठीमागें धावू लागली आणि पायांत लुगडं अडकून आपण पडलों तरी हरकत नाही; पण हिच्या तावडीत सांपडायचं नाही या ईर्ष्येनं राधिकेनहि मुळीच माघार घेतली नाही. उलट विहिरीच्या आसपास तरारून वर आलेल्या पिकांत दडून बसत मिस्किलपणानं शकुतलेकडे पहात ती गुणगुणू लागली.

' झाली लगीन घाई
ग ऽऽ चिडवू नका ग बाई . .'

" अय्या ! हो का ? तरीच तरीच हं ! " शकुंतलेन मोठ्यानं हंसून पळत जात राधिकेचा हात पकडला. इतक्यांत झेल्या आणि किसन समोरून येताना दिसल्यामुळ ती पुन्हा म्हणाली, " आली बघ ही कार्टी ! आतां आपसूक पोहायला येशील. " पण त्याच क्षणाला या मुलांच्या बरोबर आणखी कुणीतरी येत असल्याचं ध्यानांत येतांच टाचा वर करून पहात ती पुटपुटली, " हे कोण बाई नवीनच आज ह्यांच्याबरोबर ? "

" कोण ग ? " राधिकेनं मान वळवली मात्र आणि मास्तर येत असलेले दिसताच " अग बाई ! चल चल लौकर " असं गडबडीनं बडबडत ती चटकन् त्या पिकातून पलीकडे जाऊं लागली.

" अग पण हो हो ! हे 'कुणी' आलं म्हणून तुला एवढं पळून जायचं काय कारण ?" शकुतलेन रागारागान राधिकेकडे नजर वळवली; पण त्याआधीं राधिका तिच्यापासून कितीतरी लांब निघून गेली होती! त्यामुळं मोठ्या आश्चर्यानं तिच्याकडे बघून तोंडावर हात ठेवीत ती ओरडली' " म्हणजे ? काय आहे तरी काय ही भानगड ? "

" कोण शकुंतलाताई ? इकडे कुठें ग आज एकटीच ? " शकुंतलेचा आवाज कानावर येतांच झेल्यानं हंसतमुखानं तिच्याजवळ चौकशी केली.

" कां ? एकटी काय म्हणून ? राधा आली आहे कीं ! " शकुंतलेनं राधिकेकडे रागानं पहात कपाळावर आठ्या चढवल्या.

" असं का ? मग ती कुठाय् ? "

" ती बघ! तुम्हाला,म्हणजे . .हो . .हो . .हो—यांनाच पाहिल्यावर तिकडे पळाली. " शकुंतलेनं मास्तरांच्याकडे बघून आपली नजर खाली वळवली आणि जीभ चावली

" हे आमचे मास्तर आणि ही आमची शकुंतलाताई, राधिका आक्काची मैत्रिण. " झेल्यानं मास्तरांच्याजवळ खुलासा केला. त्यामुळं मास्तरांनीं मंद स्मित करीत शकुंतलेला नमस्कार केला आणि म्हटलं, " पोहायला आलां होतां ? "

" हो ना. . . . बराय् ! " शकुंतलेनं अडखळत कबुली दिली आणि ती राधिकेकडे पळून गेली.

" मी आलेंय् म्हणून सांगितलंस की काय ? " घडलेली हकीगत शकुंतलेनं सांगतांच राधिका भांबावून गेली. आपली कानशिलं गरम झाल्याचा तिला भास झाला. अंगावरचा ओला पदर पिळल्यासारखा करीत तिनं शकुंतलेला पुन्हा म्हटलं, " हा सगळा तुझा चावटपणा ! आधीच आत्याबाईच डोकं भडकलंय्, त्यात आतां ही नवी भर ! "

" मग ? आपण कांही ठरवून थोडच आलों होतों इथं ? "

" तुला कसं सांगू शके ? भारी वाईट आहे ग ती ! एकदां तिच्या मनानं घेतलं की पुन्हा फिरून बदल नाही तिथं. एखादे वेळी ती मला त्यांच्याशी बोलायची देखील बंदी करेल. नेम नाही. "

" हं ! ती ढीग करील म्हणून आपण थोडंच ऐकायच अशा बाबतीत ? अग, झेल्याचे नि किसनचे मास्तर ते. आपले थोडेच आहेत ? भेटलेच कधीं तर करावा नमस्कार नि पुढं चालायला लागावं. बोलले तर बोलावहि. " शकुंतलेनं छपरामध्यें कपडे बदलायला जातां जातां आपलं म्हणण सांगून टाकलं आणि ती आंत शिरली.

त्याच क्षणाला एकेक पायरी खाली उतरून जात झेल्यानं मास्तरांना सांगितल."आणि आमची आक्का सुद्धां चांगली पोहते बरं का मास्तर! अगदीं चाकावरून देखील उडी टाकते. आतां ह्या दोघी पोहूनच गेल्या असतील.''

"अस्सं ?" मास्तरानी समाधानान एका हुकारातच राधिकेचं या कलानैपुण्याबद्दल कौतुक करून टाकल. पण तेवढ्या हुकारात देखील तिच्याविषयी आपल्या मनांत बरीच आपुलकी वसत असल्याची त्यांना जाणीव झाली. तेव्हा ते बोलून गेले, "फारच हुषार दिसतेय म्हणायची तुमची आक्का मग!"

"हो तर! सातवीच्या परीक्षेला पाचवा का सहावा नबर आला होता सेटरला." किसननं चाकपट्टीवरून उडी मारता मारतां मास्तराच्या जवळ खुलासा केला. मास्तर नुसते हसले त्यांना विशेष बोलायला आवडत नसे आणि त्यामुळेच हसण्यापलीकडे कसलाच भावनाविष्कार प्रकट न करतां त्यांनी आपली नजर विहिरीतील मुलाच्या हालचालीकडे वळवली.

'पोरगी खरंच चलाख दिसते आहे.' मास्तराना आठवण झाली. रेल्वेमधून येतांना रात्रीच्या वेळी एका डोंगरावर आग पसरत चाललेली बघून राधिकेनं 'आभाळ पेटल्यासारख तर नाही दिसत मास्तर? का आभाळाच्या काठाला टेकून बसलेल्या डोगराच्या कपाळावर चमकदार मळवट भरलाय् हा?' अस काही तरी म्हटल्याची याद येतांच ते स्वतःशीच हसले 'कल्पना तर चागली आहे' यापलीकडे आपण तिला उत्तर देऊन आपल्याहि बुद्धीची चुणूक दाखवायला हवी होती, याची त्याना उगाचच रुखरुख वाटू लागली. त्यामुळच डोक्यावरची टोपी काढून तिची घडी घालीत ते पुटपुटले, 'हिन लेखन करायच मनावर घेतलं तर छान लिहील ही! असली मैत्रिण आपणाला लाभली हे भाग्यच म्हणायच आपल. आता आपण विषय काढायचा हा ती भेटली म्हणजे सरळ. घरात नुसत बसून तरी काय करणार आहे नाही तरी?' आणि तेवढ्यात खुद्द राधिका टॉवेलन पुसलेले केस पदराखाली खोचीत तिथं येत म्हणाली, "मास्तर, माफ करा ह! काल मी आपणाला घरात चला सुद्धा म्हटलं नाही." त्यामुळ मास्तरानी चमकून मान वळवली. राधिकेला आणि तिच्या बरोबर आलेल्या शकुतलेला नमस्कार करीत ते फक्त हंसले.

"हिला एवढ कळायला हवं ना पण! धांदरटासारखी तुम्हांला सोडून एकदम पळाली आंत. जशी काय आणखी एखादा मिनिट उशीर होत होता

तर हिची आत्याबाई पळूनच जाणार होती." शकुंतलेनं राधिकेला पुन्हा चिडवायचा प्रयत्न केला तेव्हां चिमटा घेऊन तिला गप्प बसवीत ती एवढंच म्हणाली, "आता एकदां बंद झालेल्या मनाच्या पडद्यावर रेघोट्या ओढून चिरफाड नको बाई करूंस ! झालय् तेवढं रगड आहे. गप बसायला काय घेशील ? "

"काय झाल हो ? " मास्तरांना त्या दोघीचं बोलणं उमजल नाही. त्यानी कांहीशा कुतुहलानच त्या दोघीच्याकडे पाहिल, तेव्हां शकुंतलेनं आणखी कांही बोलू नये म्हणून तिला आपल्या मागे खेचीत ती म्हणाली, "कांही नाही. हिला तशी खोडच आहे बोलायची ! बराय्, येते हं !" आणि मग क्षणभरही तिथं न थांबता शकुंतला ओरडत होती तरी दरदरां तिला पुढं ओढून नेत तिनं घराचा रस्ता सुधारला.



## : ३ :

त्या वेळी रात्रीचे आठ सव्वाआठ वाजले असतील. नेहमीप्रमाणं जेवण आटोपल्याबरोबर मास्तरांनी एक उदबत्ती पेटविली आणि टेबलावर ठेवलेल्या उदबत्तीच्या स्टँडवर खोचून दिली. क्षणार्धात खोलीभर उदबत्तीचा मधुर वास दरवळला. मास्तराना बर वाटलं. समाधानानं उदबत्तीमधून बाहेर पडणाऱ्या धुराकडे पहात ते स्वतःशीच हसले आणि पुटपुटले, 'आज असं काय होतय् बरं आपल्याला ? '

दुपारपासून थोडेफार अस्वस्थच होते मास्तर ! कसली तरी निराळीच रुखरुख त्यांच्या मनाला जाणवत होती. नेमकं काय होतं आहे हे त्यांना कळत नव्हतं; पण जिवाची ओढाताण होते आहे याचा उमज मात्र निश्चित होत होता. त्यामुळंच खोलीच दार पुढं लोटून त्यांनीं एक पुस्तक वाचावं म्हणून टेबलाच्या खणामधून बाहेर काढलं, कंदिलाची वात थोडी वर करून मोठा प्रकाश समोर ठेवला आणि समोरच्या भिंतीवरील दिनदर्शिकेकडे

सहज नजर टाकली. त्या दिनदर्शिकेच्या वरच्या भागावर एक ओलेतीच चित्र होत; पण त्यांना यापूर्वी त्या चित्रातील सौंदर्याची मोहिनी कधीच पडली नव्हती. त्याबाबत त्यांनी क्षणभर त्या चित्राकडे टक लावून बघण्या-पलिकडे कधी विचारहि केला नव्हता. का कुणास ठाऊक, पण आज मात्र त्या चित्रान त्यांचं लक्ष आपल्याकडे खेचल. हातांतील पुस्तक बाजूला ठेवून मास्तरानी तें चित्र काळजीपूर्वक पाहिलं. ताबूस काठाच पाढरं झिर-झिरीत पातळ ओलेपणामुळं अंगाबरोबर चिकटून बसलेल्या एका बाईचं ते होत. माथ्यावरून तिन पदर घेतला होता तरी ओल्या केसातून निथळ-णार पाणी पाठीवर ठिबकत असल्याच स्पष्ट दिसत होत.अगावरच्या ओल्या पातळाचा सोगा आवरून धरोत ती मान वळवून मागं पहात होती. . . मास्तर ह्या चित्राकडे टक लावून कितीतरी वेळ बघत होते. त्यांची नजर त्या चित्रावर स्थिरावली होती. हळुहळू ती बाई पुसट होत जाऊन तिच्या जागीं त्यांना राधिका उभी असल्याचा भास होऊ लागला . . .

'खरंच, तुम्हाला चांगलं पोहतां येत ?' नकळत मास्तरानी राधि-केला प्रश्न केला. ते तिच्याकडे रोखून बघू लागले; पण उत्तर येईना तेव्हा मात्र त्याना कळून चुकलं की, हा आपणाला भास होतो आहे! एखाद्या स्वप्नामधून खाडकन् जाग यावी त्याप्रमाण मास्तरानी आपले डोळे चोळले आणि त्या चित्रावर खिळलेली नजर बाजूला वळवली. कंदिलाची वर केलेली वात थोडी खाली करून ते तिथून उठले आणि खोलीत येरझाऱ्या घालू लागले. त्याची मघांची अस्वस्थता आणखीनच वाढली.

' विश्वास, तुला राधिका आवडली आहे खास.' मास्तरांचं आतलं मन त्यांच्याशी कुजबुजलं. 'होय, खरं आहे.' दुसऱ्या मनानं उत्तरहि देऊन टाकलं.

'खरंच, आपण तिच्याविषयी कां एवढा विचार करीत आहोत ?' मास्तरांनी आपल्या अस्वस्थतेचं कारण शोधायला सुरवात केली, तेव्हां त्यांना आढळून आल की, त्यांची ही शंका खरी होती आणि ते लक्षांत येतांच मात्र ते एकदम ओशाळले. 'छे, हे कांही खरं नव्हे' त्यानी आपल्या मनाला बजावलं. इतक्यांत पाटी दप्तर खाकोटीला मारलेला

झेल्या त्यांच्या खोलींत एकदम घुसत म्हणाला, " मास्तर, मघांशीं मी आक्काकडे गेलो होतो, तर तिनं मला विचारलं, ' झेल्या, मास्तर खरंच चांगलं शिकवतात का रे ? ' मी म्हणालों, 'हो हो, अगदी उत्तम! आमच्या वर्गात येऊन तर बघ. ' त्यावर ती हिरमुसल तोंड करून म्हणाली, 'नशीब लागतं ना अशा चांगल्या मास्तरांच्या हाताखाली शिकायला मिळायला !' मग मी म्हणालों, ' त्यांत कसलं नशीब ! तू सातवी पास झाली असलीस तरी सुद्धा मास्तर शिकवतील अजून !' खरं ना ?"

राधिकेच नाव निघतांच मास्तराचा चेहरा गोरामोरा झाला. पुन्हा त्यांच मन तिच्याविषयी विचार करूं लागलं. झेल्या समोर येऊन बसल्याचं भानहि त्याना उरल नाही ! पण झेल्या त्यांना थोडाच गप्प बसूं देणार होता ? त्यान भाजून बरोबर आणलेले शेंगदाणे मास्तराच्या हातावर ठेवीत म्हटले, " मास्तर, आज शिकायला नको मला. एक गोष्ट सांगतां का नवी फक्कडशी ? "

मास्तराना गोष्टी लिहितां येत होत्या. त्याना वाचनाचा बराच नाद असल्यामुळे लोकाच्या वाचलेल्या गोष्टी ते मुलाना सागू शकत होते. तस करण्यात त्याना आनद होत होता. पण झेल्यान आतां गोष्टीचं आणि तेहि नव्या गोष्टीच नाव काढतांच ते चटकन् बोलून गेले, " झेल्या, नव्या गोष्टीला आताशी कुठ सुरवात झाली आहे ! अजून ती पुरी व्हायला फार वेळ लागेल. तू आपला अभ्यासच् कर बघू या. आज तुला गोष्ट सागण्याइतक डोकं ठिकाणावर नाही माझं. भारी ठणकतंय् दुपारपासून "

जेवणवेळ टळून गेल्यावर शेवतीआक्कानी सागितलं होतं म्हणून राधिका चुलीजवळ आली. शेणकुटाच्या विस्तवावर बराच वेळ ठेवलेल्या दुधाण्यात त्या वेळी चागली साय तरंगत होती. राधिका हळूच खालीं बसली. गुडघ्यावर रेलून ओणवी होत तिन त्या साईकडे पाहिल खापरासारखी साय नजरेला पडतांच तिनं हलक्या हातानं दुधाण्यातील साईचा बारीकसा तुकडा काढून घेऊन तोडांत घातला आणि ती स्वतःशीच म्हणाली, ' ह्या साईसारखं एखाद्या माणसाचं मन एका जागींच घट्ट होऊन राहील तर त्याच्या इतकं सुख कुणालाच मिळायचं नाहीं

जगांत !' पण तसं थोडच घडण शक्य होतं ? तशांत शेवंती आक्कांच्यासारखी आत्याबाई आणि राधिकेसारखी भाची असल्यावर तर मुळींच नाही. दोघीहि एकमेकीना पुरून उराव्यात अशा होत्या. पण आज मात्र राधिकेला थोडी हार खाल्ल्याचा भास होत होता खरा. दुपारपासून तिचं लक्ष कशिदा काढण्यावर कसल तें लागत नव्हत. म्हणून शेवंतीआक्का जेव्हां म्हणाल्या, ' आजपासून तू कुठ जात जाऊ नगस. पवायला काय न्हान न्हाईस आतां. ती शकी आली तर तिला म्हणावं याची न्हाई ! ' तेव्हापासून कदाचित आपल्याला आतां घराबाहेर पडण जिकिरीच होईल अशी तिच्या मनान धास्ती घेतली होती.

दुधाणं खाली जमिनीवर घेऊन राधिकेनं विरजण्यांत सगळं दूध ओतलं आणि मुरवण घालून झाल्यावर शेवती आक्काना मोठ्यान हांक मारीत विचारल, ' खरवड खाऊ ना ग सगळी ? " त्यावर अथरुण घालून आलेल्या शेवतीआक्का तिला जवळ घेत म्हणाल्या, " ह्या दुधावरच्या साईवानी तुला लहानपनापासन तळातात झेलली ती काय असं इच्यारायला व्हय ? खुळी तर न्हवस ? नुसती खरवडच काय, पर सार दूध पेलीस तरी दिकुन इच्यारलं तरी मग एक अस् दे. "

शेवंती आक्काचा प्रेमळ स्पर्श होताच राधिका त्यांच्या कुशीत शिरली. दिवसभर विचार करून करून मनाला आलेला शीण एकदम नाहीसा झाल्याचं समाधान त्या क्षणाला तिला लाभल लहानपणापासून तिला आपल्या आई–वडिलापेक्षा शेवती आक्कांचाच भारी लळा त्याना सोडून घटकाभर कुठं रहायच म्हणजे तिच्या जिवावर यायचं आणि म्हणून तर ती आजोळाहून झटपट परतली होती. त्याबद्दल त्या दोघीहि खूष होत्या. पण मास्तराच्या सहवासानं गेले दोन दिवस त्यांच्या परस्परांवरील मायेत बिब्बा घातला गेल्यासारख झालं होतं ! एवढंच नव्हे तर क्षणभर का होईना, शेवंतीआक्कांना सोडून मास्तराच्या सहवासांत रहायला राधिका उतावीळ झाली होती आणि त्यामुळच तिला वाटत होतं की, दुपारी म्हटल्याप्रमाणं आत्याबाईनं खरच कुठं जाऊ दिलं नाही तर मास्तर भेटण्याची शक्यता मुळीच उरलेली नाही. ' छे बाई ! मास्तर

भेटले नाहीत तर कसं तरीच वाटेल आपल्याला. काय बिघडलं हिचं मी त्याच्याशी दोन शब्द बोलले म्हणून ? ' राधिकेच्या वेडचा मनाला ही ओढ लागली होती. पण शेवंतीआक्कांना ते कसं कळावं ? आणि कळून तरी उपयोग काय होता ? त्यांना नेमकं हेच घडायला नको होत ! आणि त्यासाठीच त्या तिच्यावर थोडया चिडल्या होत्या.

दुधाण्यातील शिपलीभर खरवड शेवतीआक्कांनीं राधिकेच्या तोडांत घातली आणि तिच्या तोडावर आपला पदर घालून तिला पोटाशी आवळीत त्या म्हणाल्या, " तू जवळ नसलीस की खुळचावानी हुतया बग. न्हानगी हुतीस तवर काय वाटल न्हाई. पर आता ... तुज लगीन करायच म्हटल तरी कालवाकालव हुतीया पोटात. वाटतया प्वाट फाडून तुला आत ढकलून पुनाच्यान ते झाकून टाकाव ! तुज्याबिगर जगायची ग कशी मी पोरी ? पर तुला ते कळल तवाची गोष्ट न्हव ? देवानं तुला न्हानगीच ठेवली असती तर बेस झालं असतं . . . "



## : ४ :

ठण् ण्. .ठण् ण् ण्. .ठण् ण् ण्. .

शाळेची घटा झाली. वर्ग आता सुरू होत असल्याची सूचना सर्वांना मिळाली. शाळेच्या आवारांत मनमुराद खेळत असलेली लहान लहान मुलं या सूचनेचा आवाज कानावर येतांच पाखराचा थवाचा थवा आभाळांत उडताना दिसावा, त्याप्रमाण एकदम वर्गाकडे धांवली. झेल्या आणि किसनहि त्या घोळक्यांत होतेच. झेल्यानं पाटीदप्तर खाकोटीला मारून पळतां पळता खिशातील एक चिंचेचं बोटूक कुणाला न कळत एकदम तोंडात कोंबल आणि मिटक्या मारीत तो वर्गात घुसला.

" मास्तर, आज की नाही. .हं. .मास्तर. .' ' मास्तर वर्गांत आल्याबरोबर झेल्या टेबलाजवळ गेला. पण चिंचेचं बोटूक टाळचाला चिकटलं

असल्यामुळं त्याला धडपणें बोलतां येईना तो बराच अडखळतो आहे व मधूनच मिटक्या मारीत तोंड हालवतो आहे हें बघून मास्तर त्याच्याकडे निरखून पहात म्हणाले, " काय रे झेल्या, वर्गांत अस खात यायच असतं ? बाहेर हो बघू अगोदर ! "

मास्तराचा राग आणि लोभ झेल्याच्या ओळखीचा झाला होता. त्यामुळं तोंडातील चिच गटकन् गिळून टाकीत अखेरची अशी तोंडाची विशिष्ट हालचाल करून तो म्हणाला, "वर्गात यायच्या आधीत चिच खाल्ली होती. पाहिजे तर किसनला विचारा. "

" बरं बर. तू जाग्यावर चल. पुन्हा हे चालणार नाहीं ह ! " मास्तरांनीं टेबलावर हात आपटून वर्गाला इषारा देत झेल्याला दम भरला. तरी पण झेल्या इचभरहि जागचा न हलतां म्हणाला, " मास्तर, एक विचारूं का ? "

" आधीं तू जाग्यावर चल. " मास्तरांनी झेल्याला हातानं खुणावलं. त्यामुळं आपल्या जागेवर जातांना तो मागें वळून पहात म्हणाला," मास्तर, आता आपल्या शाळेचा बक्षिस समारभ आहे, नाही का ? "

" बर मग ? म्हणणं काय तुझं ? "

" आपण नाटक करू या आपल्या वर्गाच ! "

" हो हो, करूं याच ! " झेल्याला त्याच्या वर्गातील इतर मुलानीं जोराचा पाठिंबा दिला. पण तिकडे दुर्लक्ष करून मास्तर म्हणाले, " तें बघूं या मग. रोजचा अभ्यास आधी पुरा झालाच पाहिजे. भूगोलाचा तास आहे, नाही आज ? "

" असू दे ! आम्ही सगळं पाठ म्हणून दाखवू. पण आधी आमच ऐका मास्तर. सगळ्या शाळेंत आमचा वर्ग उठून दिसायला पाहिजे. आम्ही पोरांच्याजवळ पैज मारली आहे. " झेल्यानं आपलं म्हणण पुन्हा एकदां पुढं केलं आणि त्याला साथ देऊन ही गोष्ट पक्की करावी म्हणूनच की काय किसनहि म्हणाला, " आमची आक्का नाटकांतील गाण्याची चाल सांगते आणि ती गाणीहि शिकवते म्हणाली आहे ! पाहिजे तर–हो–तुम्ही सांगितलं तर ती भाषण सुद्धां शिकवील मला आणि झेल्याला ! "

राधिकेला गाणं येतं याची ही पुसट चाहूल लागतांच मास्तरांच्या तोंडा-

वर आनंदाची छटा उमटली. पण मुलांच्या तें लक्षात येऊ नये म्हणून मुद्दामच त्यांनी ह्या विषयाला कलाटणी देत म्हटलं, " जरूर पडलीच तर पहातां येईल. शाळेच आतां इन्स्पेक्शन आहे तेव्हां आपला अभ्यास पूर्ण व्हायला पाहिजे शक्य तो लवकर. मान्सून वारे आले ना सर्वांच्या लक्षात?"

" नाही ! " झेल्यान एकदम मान हालवली खरं म्हणजे आपण नकारार्थी मान का हलवली हे त्याच त्यालाहि कळल नाही. पण त्यामुळ मास्तर मात्र चिडले, "लक्ष कुठं होत मग ? "

" माझ ? " झेल्या भानावर आला त्याला काय उत्तर द्याव हें सुचेना. क्षणभर तो घाबरला. वर्गातील मुल त्याची ही तारांबळ बघून फिदीफिदी हसली. तेव्हा एकेकावर एवढाला डोळा फिरवीत झेल्यान सागून टाकलं, " आक्का आली म्हटल्याबरोबर तिला भेटायला केंव्हां जाईन असं झाल ! आणि म्हणून. . . . "

राधिकेबाबतची ही सबब पुढ येतांच मास्तरहि घटकाभर गोंधळून गेले. गेल्या दोन दिवसात खुद्द त्याचहि लक्ष कशांतच नीट लागत नसल्यामुळें झेल्यावर रागवायच त्याच अवसान गळून गेल. ते त्याच्याकडे नुसते बधत राहिले. त्यामुळ झेल्याला वाटल मास्तर फारच सतापले आहेत. म्हणून त्यानीं सागायच्या आधीच खुर्चीची शिक्षा उपभोगीत वर मान करून तो खटयाळपणान हसत म्हणाला, " कालच देवळातल खोबर दिऊ का मास्तर प्रसादाच ? "

" गाढव आहेस लेका ! " मास्तर झेल्याच्या ह्या धडपडीबद्दल हसले आणि त्याच्या पाठीत एक हलकासा धपाटा घालीत त्यानी त्याला नीट उभा केला.

त्याच वेळी राधिकेला आपल्यासमोर उभी करीत शकुंतला म्हणाली, " अस गप्प गप्प रहायला झाल काय तुला ?"

" कांही नाही. तुझ आपल काही तरीच ! " राधिकेन शकुतलेची नजर टाळायचा प्रयत्न केला.

" अस्सं ! राघवदासाचा फेरा अजून गेलेला दिसत नाही म्हणायचा. थांब, आतां आत्याबाईनाच विचारतें हिला काय होतंय् म्हणून आणि तुम्ही काय बोललांत तेहि कळू द्या म्हणून. " राधिकेकडे रागारागानं

पहात शकुतला माडीवरून खाली निघाली. इतक्यांत शेवतीआक्काच माडीवर येत तिला म्हणाल्या, " आज येरवाळी आलीस ? कामबिम न्हाई वाटत घरात ? ताक कर चल बगू तेवढ. डेराबिरा फोडलास तर मातूरयाद राकून आस हं ! " आणि त्यानी राधिकेला बजावलं, " तेवढी देवाची पूजा कर जा बगू तू ! "

राधिकेला इतर कोणत्याहि कामापेक्षा या कामाचा मुलखाचा कंटाळा. त्यामुळ ती एकदम उसळली, "कर जा, नाहीतर बस जा ! माझ नाही नडल."

" काय म्हटलीस ? " शेवंतीआक्कांनी डोळे वटारले. पण एरव्ही त्यांच्या रागाला घाबरणारी राधिका आतां त्याच्यावरच आपली नजर रोखीत म्हणाली, " मघांशीच ऐकायला पाहिजे होतंस. देव तुझा नि मला कां हा नसता त्रास मेला ? "

" माजा देव काय ? थाव तुला दावतेच कुनाचा हाय त्यो. आयतं खायाला मिळतंया तवा जीभ चुरचुरतीया ! " शेवतीआक्का फणकाऱ्यानं निघून गेल्या. त्यामुळ त्यांच्याकडे ओझरतं पहात शकुतलेनं विचारल, " आतां ग ? "

" म्हणजे ? खुशाल रागाऊं दे ह्याच्या दसपट पाहिजे तर. नाहींतर काय ? मला नाही बाई आवडत ही देवपूजा ! " राधिकेनं देवपूजेबद्दल तिरस्कार व्यक्त केला, तेव्हा शकुतला खटचाळपणानं हसली. " नाहीच ना आवडायची ! . . . मनांत भलताच देव भरल्यावर ही पूजा करायला सुचल तर पाहिजे माणसाला ! "

" चल चावट कुठली ! " राधिकेनं शकुंतलेच्या पाठीत एक धपाटा घातला आणि तिच्यावर डोळे वटारले.

" इश्य ! खोट का बोललें मी ? खरं सांग, अगदीं आत्याबाईच्या शपथ मी बोललें हें खोटें आहे म्हणून ! "

" छट् ! शपथ कसली भलत्याच गोष्टीत ? माझी आत्याबाई म्हणजे तुला काय वाटलं ? अं ? "

" तें दिसतंच आहे ! बाकी इतकं उलटं बोलणं ठीक नव्हे तुझ्यासारखीनं तरी. "

" खरं आहे. पण. .पण सहनशक्तीला तरी मर्यादा असतेच कीं माण-साऱ्या. मनाचा धागा ताणून ताणून किती ताणला जाईल ? पतंगाच्या दोरीसारखं तरी त्याचं शेपूट लांबत नाही ना ग ? " राधिकेच्या डोळ्यांत पाणी तरारलं. शकुंतलेला धक्का बसला ती चटकन् तिच्यापुढं होत म्हणाली, " काय झाल ग ?" त्यावर पदरानं डोळे टिपीत राधिकेनं एवढंच सांगितलं, " सगळ्याच गोष्टीना वाचा फुटत नाहीं शके. कांही कांही गोष्टी नुसत्या जिभेवरच रेंगाळतात. तरी पण एवढं बरीक खरं की, मला शाळेंत घाला-यला नको होती आमच्या माणसांनी. "

" मूर्ख आहेस अगदी ! "

" कोण? मी ? "

" हो, तूंच. शिकलीस म्हणून तर अक्कल वाढली तुझी आणि हें काय भलतच बोलणं ? मोठी माणस अशीच रागावणार. मला नाही का आमची आजी बोलत ? "

" आमचे आजोबा आणि ही आत्याबाई हे आहेत तोंवर ठीक पण जर का एकदां बिनसलें तर मग विचारूं नकोस. एका मोठ्या शेतकऱ्याशीं म्हणे माझं लग्न करणार आहेत आजोबा ! "

" खरंच ? "

" होय. त्यांचं नि ह्या आत्याबाईचं कांही तरी बोलणं चाललं होतं परवां. "

" बर, मग तुझ काय म्हणण ? "

" मला श्रीमत शेतकऱ्यापेक्षां गरीब का असेना, पण शिकलेला नवरा अधिक आवडेल. " राधिकेन मनातील गोष्ट मैत्रिणीसमोर उघडी केली खरी; पण तिला काय वाटल कुणाला ठाऊक? माथ्यावरचा पदर तोंडावर ओढून तिनं चटकन् आपल तोंड झाकून घेतलं आणि ती स्वतःशीच कुज-बुजली, 'मनच्या गोष्टीचे ठसे काढणारं एखादं यंत्र निघालं तर फार बर म्हणजे मनाला ताण न पडतां आठवणीचं गाठोडं घेऊन कुठेंहि भटकतां तरी येईल माणसाला..'

## : ५ :

" मी तुझ्या कांतिचें वल्कल ल्यालें,
तुझे रूप नयनी, प्रभुजी तुझें नाम वदनीं . ."

देव्हाऱ्यांतील देवाचे वर शेवती आक्कांनी उगाळून ठेवलेल्या गंधाचा अभिषेक करीत तन्मयतेन राधिका गात होती. तिचा आवाज आज विशेष गोड वाटत होता. म्हणून शेवती आक्काहि आवडीनें ऐकत मागें उभ्या होत्या. त्याची मान डुलत होती. गाण्याच्या ठेक्याबरोबर हातांची हलकीशी टाळी पडत होती. समाधानान त्यांचे डोळे उदबत्तीच्या सुगंधांत मनापासून गात पूजा करणाऱ्या राधिकेवर खिळले होते. इतक्यात बाहेरच्या ढेलणेत आजोबा कुणावर तरी कडाडले, " चालता व्हो माज्या म्होरनं ! माज्या पोरगीच नक दिकुन नद्र पडायचं न्हाई, तें ती कुठली दिसायला ? . . . . "

" कोण ग ? " राधिका आजोबाच्या आवाजानं दचकली. तिच्या हातांतील रुकेश्वराच फूल खालीच गळून पडलं. तिच्या पोटांत धस्स झालं. ' मास्तर तर आले नसतील ? ' तिला शका आली. कावरी बावरी होत तिन आत्याबाईकडे पाहिलं.

" बग बर कोन हाय त्ये ?" शेवती आक्कांच्या काळजांत धडधडलं, हातापायाला एकदम मुग्या आल्या, घमा कोरडा पडला. ' आपला नवरा विठोबा तर आला नसेल ? ' त्याच्या नजरेसमोर अधेरी आली.

" होय; तुझा नवराच आलाय् ! " राधिका गडबडीनं बाहेर जाऊन डोकावून आली. तोंडात आश्चर्यानं बोट घालीत तिनं शेवंती आक्काना विचारलं, " आजोबा असे कां रागावताहेत ग तुझ्या नवऱ्यावर ? तुला कां नाही भेटायचं त्यानं ? . . . . "

शेवती आक्कांच्या काळजालाच राधिकेनं हात घातला. एवढी कडक बाई; पण नवरा आल्याचं कळतांच भांबावून गेली. थरथरणार शरीर कसं तरी सावरून धरीत त्यांनीं राधिकेला जवळ ओढली आणि म्हटलं

" नशिबाचा ख्योळ हाय माज्या ह्यो ! देवानं कपाळावर रेगच वडलीया वाकडी तिकडी, त्येला कोन काय करणार ? . . . ." आणि त्याच क्षणाला विठोबाचाहि आवाज आला, " येळ आली मंजी ह्यो फाकड्याबी बगून घील ! कुणाला भ्यां घालतूस ? "

शेवती आक्कानी व राधिकेन सोप्यांत येऊन पाहिल. विठोबा संतापानं लाल होऊन दरवाजातून बाहेर पडत होता.

" अगबाई, निघाला की ग तो खरच ! " राधिकेन मोठ्या नवलान आत्याबाईकडे पाहिल. पण शेवती आक्का निश्चल नजरेन त्या वेळीं समोर बघत होत्या. फार दिवसांनी ओझरत का होईना दर्शन घडलेल्या नवऱ्याला डोळ्यांत सांठवून घ्यायला त्यांच मन आसुसल होत.

विठोबा तसा रुबाबदार दिसत होता. शरीर पीळदार होतं. रगानं गोरा होता ओठावर मिशांचे मोठे आकडे होते अगात सैलसर रेशमी सदरा होता. पाढरं शुभ्र पायघोळ धोतर तो नेसला होता. त्याच्या हातात सोन्याचं कडं होत आणि कानात टपोऱ्या मोत्यांची भीकबाळी होती. डोक्यावर कडक आर दिलेला कोल्हापुरी फेटा होता आणि हातांत एक टणक छडी होती.

शेवंती आक्का किती तरी वेळ तिथच उभ्या होत्या. टक लावून दरवाजाकडे पहात होत्या. राधिकेनं त्यांना विचारल, " तू तरी त्यान हांक मारायची नाहीस ? "

पण त्यावर शेवंती आक्का कांही बोलायच्या आधीच त्या दोघीकडे रागानं पहात आजोबा खेकसले, " डोळे फोडून टाकीन अशी त्येची वाट बगत हितं थांबलीस तर ! चालती हो घरांत ! "

" चल पोरी ! " भरल्या गळ्यानं शेवंती आक्कांनी राधिकेचा हात धरून तिला घेऊन त्या जड पावलांनी घरांत आल्या. अंगातील सारं अवसान गळून गेल्यासारखं त्यांना वाटल.

" आत्याबाई, तू कधीच का ग आपल्या नवऱ्याशी बोलली नाहींस ? " राधिकेनं मोठ्या उत्सुकतेन शेवंती आक्कांच्या डोळ्यांत पाहिलं. पण त्या कांहीं बोलल्या नाहीत. खाली मान घालून पदरानं डोळ्यांच्या ओलसर

कडा टिपीत त्यांनीं हलक्या आवाजांत तिला सांगितलं, " तूं न्हान हाईस अजून ! बस जा वाचीत. "

अशा वेळी शेवती आक्का कांही बोलणार नाहीत, हे लक्षांत येतांच राधिका उठली आणि सरळ शकुंतलेच्या घरी आली.

त्या वेळी शकुंतला आपल्या पोलक्यासाठी आणलेल्या काळ्या खणावर कशिदा वाढीत बसली होती. राधिका आलेली पहातांच तिचा हात धरून आपल्याजवळ बसवीत तिनं विचारल, " बरी सवड झाली ग आज ? "

" शके ! " राधिकेनं गभीर नजरेनं कुठ तरी पहात शकुंतलेला हाक मारली.

" काय ग ? अशी गभीरशी आज ? "

" खरच, कांही गोष्टी वाचण्यासाठी लिहितात, तर कांही हातांत कागद पेन्सिल न घेतां सुद्धा आपोआप लिहिल्या जातात का ग ? "

" म्हणजे ? " राधिकेच्या बोलण्याचा शकुंतलेला अर्थ कळेना. ती बुचकळ्यांत पडली.

" साग ना पण, म्हणतें ते खरं ना ? "

" असं कां म्हणते आहेस? मला नाही बाई कळलं. "

" नाही कळलं ? कसं कळाव ? ज्याच दुःख त्यालाच माहीत. नाहीं तर आमची आत्याबाई तरी मला कांही न सागतां गप्प कशी बसली असती ? " राधिकेनं झाला प्रकार शकुंतलेला थोडक्यांत सांगितला आणि ती मघापेक्षाहि गंभीर झाली.

" आपल्याला ह्या मोठ्या माणसांचं नाही बाई कांहीं कळत ! स्वतःच्या नवऱ्याला बायको भेटू शकत नाही म्हणजे आश्चर्यंच कीं ग ! " शकुंतलेनं हातांतील खण बाजूला ठेवला आणि राधिकेच्या खांद्यावर हात टाकीत आपला आळस झाडून टाकला.

" माझं डोकं कसं सुंद झालंय् बाई ! " राधिकेनं कपाळाला हात लावीत भुवयांच्या मधली जागा थोडीशी दाबली.

" वेडाबाईच आहे ! तुझ डोकं दुखायला काय झालं ग ? "

" मला बाई भीति वाटते. " राधिकेनं सरळ होतं तें सांगून टाकलं· मास्तरांचं आणि तिचं लग्न व्हायचं म्हणजे असा कांहीं प्रकार होणं शक्य होईल कीं काय याची तिला धास्ती वाटत होती. पण तिन तसं बोलून दाखवलं नाही. शकुंतलेनं मात्र तिच्या मनाचा बरोबर कानोसा घेतला.

" तुझे ते पुष्कळ खंबीर आहेत. ते थोडेच तुझ्या आत्याबाईला की आजोबाला दाद देणार ? "

" इश्य ! हें काय भलतंच ? " राधिका एकदम गोंधळून गेली. शकुंतलेनं कुणाबद्दल असा उल्लेख केला होता याचा तिला उमज पडेना. म्हणून तिनं तिला जोराची चापट मारीत दटावल, " पुन्हा असं काही म्हणशील तर बघ हं ! ते म्हणजे कोण ग ? "

" छान ! मला विचार ! जमलंच म्हणायच मग. मला ग काय माहीत ? कधी सागितलं तरी आहेस ? "

" नाही ना, मग गप्प बसत जा अशी बडबड करण्यापेक्षा ! "

राधिकेनं शकुंतलेच्या हाताला जोराचा चिमटा घेतला आणि ती बाहेर पळाली. पण दरवाजांत जाऊन पोचते न पोचते तोच तिची पावलं एकदम थबकली. त्यामुळं तिला मारायला म्हणून तिच्या मागून धावणाऱ्या शकुतलेनं बाहेर डोकावत तिला विचारल, " थाबलीस का ? " आणि मग तिच्या ध्यानांत आलं की, तिच्या दारावरून मास्तर निघून गेले होते. त्यांना बघूनच ही थांबली होती तर ! तिची शंका बरोबर टरली म्हणून तिन तिला विचारलं, " तुझे ते म्हणजे आतां हे कुणी इकडून गेले तेच ना ग ? "

" छट् ! तुझ्या जिभेला कांही हाड ! " राधिकेनं शकुंतलेच्या दडाला धरून तिला ओढीत ओढीत घरांत आणली. आंत आल्याबरोबर हिनं असं कां केलं म्हणून शकुतलेनं हळूच तिच्या चेहऱ्याकडे वाकून पाहिलं, तों तिचं तोंड लालबुद झालेल आणि ती कमालीची लाजलेली !

० ० ०

: ६ :

"कोणतंहि भरीव काम हाती घ्यायचं म्हणजे स्वतःचं देखील भान रहाणार नाही, इतकी उत्कटता तें काम करण्यात निर्माण झाली पाहिजे; आणि तितक्याच उत्कटतेनं ते करण्याची ईर्ष्याहि मनांत निर्माण व्हायला पाहिजे . . ."

मास्तरांनी आपल्या रोजनिशीत हा मजकुर सुरवातीलाच लिहून ठेवला. त्यानंतर त्यांनी टाकाची शाई नीफ दौतीला पुसून काढून टाकली आणि समोरच्या दिव्याकडे नजर वळवली.

गेले कित्येक दिसस हा दिवा मास्तरांच्या टेबलावर होता त्यान त्यांना मनापासून सोबत दिली होती. जिवाभावाचं अस दुर्दैवानं घरचं कुणी त्यांना नव्हतं म्हणून त्याच्या दोस्त मडळीनी त्यांना कधी प्रेमाची वाण भासूं दिली नव्हती हा दिवाही त्यापैकीच एका मित्राच्या प्रेमाचें प्रतीक म्हणून त्यांच्या घरी आला होता. तो देतेवेळी त्यांच्या मित्रानं त्याना म्हटल होतं, 'विश्वास, या दिव्याच्या प्रकाशांत तुला चांगला मार्ग दिसू दे. तू डोळसपणान वागावंस अशी अपेक्षा आहे माझी.' मास्तरांना आठवण झाली. काळजांत लकलकल्यासारखं झाल. गेल्या चारसहा वर्षात त्या मित्राची आणि त्यांची गांठभेट झाली नव्हती. तो सैन्यात सामील झाल्यामुळं त्याचा पत्ताहि त्याना मिळाला नव्हता. मधून मधून त्याच्या आठवणीनं ते अस्वस्थ व्हायचे पण मग मनाची समजूत घालून ते स्वतःशीच म्हणत, 'येईल आज ना उद्यां. तोंवर हा दिवा मात्र जतन केला पाहिजे चांगला.' आतांहि मनाची तशीच समजूत घालीत मास्तरानी कंदिलाची वात वर केली. विचाराच्या तद्रीत ते इतके तल्लीन झाले होते की, वात किती वर गेली आहे याचं त्यांना भान राहिलं नाही ! त्यामुळं काच एकदम तडकली !

'छे! हें काय भलतंच झालं ?' कंदिलाच्या काचेवर पडलेली चीर नजरेला पडतांच मास्तर अस्वस्थ झाले. भर्रदिशी त्यांनी इतकी वात खालीं केली की दिवा अजिबात मालवला गेला. मास्तरांना कसं तरीच वाटलं. काळीज चरकल्याचाच जणुं त्यांना भास झाला !

'कोणी काय वाटेल तें म्हणू देत. राधिका मला आवडली आहे एवढ खरं. तिच्या भाषेत बुद्धीची चमक आहे आणि जिभेवर माणुसकीला शोभून दिसणारा नितांत आदर नांदतो आहे.' मास्तरांनी काडी ओढून कंदील लावला आणि मनांत कांहीतरी ठरवून टाकल. सकाळपासून मनाला लागलेली रुखरुख त्यामुळं कमी झाली. त्यांना हलकंसं वाटलं, त्यांची अस्वस्थता कमी झाली.

नाहीतर सकाळी झेल्याजवळ राधिकेला पत्र दिल्यापासून त्यांना उगा-चच हुरहूर वाटत होती. पोरांच्या हट्टापायी आपण भावनेच्या भरांत उगाच चिठी लिहिल्याचा थोडासा पस्तावा त्यांना होत होता ! अधून मधून आपण चिठीत काय लिहिलं आणि ती वाचल्यावर राधिकेला काय वाटेल याचा पडताळा ते मनाशी घेत होते. पण त्यांना निश्चित समाधानकारक असं उत्तर मिळत नव्हतं.

'तुमचं गाण मला अगोदर ऐकायला मिळेल तर चांगलं.' मास्तरांनी त्या चिठीतील हें वाक्य पुन्हा एकदां मनांतल्या मनात उच्चारल आणि मग आणखी त्यांच्या मनाला निष्कारण हुरहूर लागली, 'छे ! झेल्याबरोबर नुसता निरोपच दिला असता तर उत्तम ! आपण चिठी लिहायला नको होती.' पण तेवढ्यात किसन आनंदानं उड्या मारीत त्यांच्या खोलीत येत म्हणाला, " मास्तर, आक्का म्हणाली की गाणं शिकवीन तुमची चिठी वाचली तिनं आणि मग म्हणाली की, चिठी मिळाली म्हणून सांग. आता नाटक करायच ना आपल्या वर्गाच ? "

कांही तरी विशेष बहादुरी गाजवून येणाऱ्या वीराप्रमाणं किसनन भराभर बातमी दिल्यामुळं मास्तर हंसले आणि त्यांनी मान डोलावली. 'इथं तर सगळ ठीक दिसतंय्. आपण उगाचच नाही नाही तो विचार करून डोकं शिणवून घेतलं !' मास्तरांना आपल्या मनाचा क्षणभर राग आला. पण राधिकेनं मुलांना गाणी शिकवायची जबाबदारी पत्करल्यामुळं ते खुशीत येत म्हणाले, " आणखी काय म्हणाल्या त्या ? "

" कांहीं नाहीं. आमची आत्याबाई लगेच जवळ आल्यामुळं . ." किसननं पुढचं बोलणं तसंच हवेंत सोडून देऊन जीभ चावली. राधिकेनं आत्याबाई-

बद्दल मास्तरांच्याजवळ कांही बोलू नको म्हणून त्याला बजावलं होतं !

" आत्याबाईचं काय रे ? " मास्तरांना थोडी शका आली. पण किसननं त्यांना कसलाच थांगपत्ता लागूं दिला नाही. उलट जोरानं एक शीळ घालीत त्यानं मास्तरांना विचारलं, " नाटकाचं नांव काय ? तुम्ही केव्हां लिहिणार नाटक ? "

मास्तरानीं किसनला आपल्या समोर उभा केला आणि कपाळावर आठ्या चढवीत म्हटल " तुझी आक्का चिठी वाचल्यावर आणखी काय काय म्हणाली सांग. "

" कांही नाही म्हटलं ना एकदां ! तिनं चिठी वाचली आणि आपल्या पोलक्याच्या खिशांत ठेवून दिली. कुणी बघायला नको ना ! "

" का रे ? "

" अ ऽऽ कांही नाही. बरं, मी जातों आणि झेल्याला घेऊन येतों ह ! " किसन आला तसाच उड्या मारत निघूनहि गेल्यामुळ मास्तराचा नाइलाज झाला. पण त्यांच कुतुहल मात्र वाढलं. ' खरच, आपल्याशी गप्पा मारायला तिला आवडेल ? पण ते कस शक्य आहे ? आपल्याला तिच्याबद्दल पुष्कळ वाटत असलं तरी समाजाला त्याची चाहूल लागण कितपत श्रेयस्कर ठरेल ? लोक कोणत्या भूमिकेतून आपल्याकडे पहातील !

' तिच्या आत्याबाईच नुसत नाव उच्चारूनच हे कार्ट गप्प राहील ! म्हणजे खुद्द तिला आणि तिच्या घरच्या माणसांना तरी आपल्याबद्दल कितीशी आस्था असेल ? '

मनाची अस्वस्थता दूर करावी म्हणून मास्तरांनी टेबलावरचं एक पुस्तक उघडलं.

आणि त्याच क्षणाला हातांतील पुस्तक बाजूला भिरकावून देत राधिका गच्चीवर आली. गेले दोन दिवस ती सोडवायचा प्रयत्न करीत असलेलं कोडं तिला अजूनहि सुटत नव्हतं. ' आत्याबाई आपल्याला कळतय् तसं सासरीं कशी गेली नाही ? आणि तिचा नवरा आपणहून आला तरी आजोबांनीं त्याला कां हाकून द्यावं ? ' आणि म्हणूनच तिला विलक्षण गोंधळून गेल्यासारखं झालं होतं.

" झालं का ग सगळं ? "राधिकेनं शेवंती आक्कांना गच्चीवरूनच प्रश्न

केला. त्यामुळं ढेलणेंत बसलेले आजोबा म्हणाले, " वाईच तू खालीं ये आन् करूं लाग की तिला. नुसतीच इच्यारतीयास ती ? आई म्हायारात, बा जत्राला गेल्याला आन् तू बुकांत डोस्कं खुपसून माडीवर बसल्याली ! " आणि खदखदून हंसलेहि.

" मघांशी तर चुलीपुढून उठलें मी ! " राधिकेनं ठसक्यानंच आजोबांना उत्तर दिलं आणि ती परत माडीतल्या खोलीत आली. तिला चीड आली, " किती काम केल तरी आहेच ह्यांचं ! हा काय माझा संसार थोडाच आहे म्हणून चोवीस तास मीच काम करावं ? " पण तिनं चटकन् उजव्या हाताचं बोट दाताखालीं धरलं. आपण काही तरी भलतंच बोलल्याची जाणीव झाल्यानं ती ओशाळली. ' संसार कुणाचा का असेना, हें घर आपलं तर आहे ! ' तिची तिनंच मनाची समजूत घातली. पण तिच्या मनाचं तेवढ्यानं समाधान झालं नाही. मास्तरांचा विचार नकळत तिच्या मनांत डोकावला, ' हो; असं कांही झालंच तर तो संसार मात्र आपला होईल. हे घर आपल असलं तरी काम केलंच पाहिजे असं नाही. माहेरवासीण हंसत खेळतच माहेरात वाढते असं आत्याबाईच कितीदां म्हणाली असेल ! ' आणि घटकाभरानं मग तिच्या ध्यानांत आल कीं, आपली आत्याबाईसुद्धां माहेरी असतानाच अविश्रात कष्ट घेते आहे !

" ती करूं दे हव तेवढं काम. मी नाही करायची. काय म्हणण आहे ? " राधिकेनं तोंडांतल्या तोंडात पुटपुटून जणू आजोबांनाच उत्तर दिलं. पण तें इतकं हळू की, तिच तिलाच धड कांहीं ऐकू आलं नसाव ! त्यामुळ तीच मोठ्यांदा हंसली आणि आजोबांना हांक मारीत म्हणाली, " तुम्हाला वाचून दाखवू का कांहीं ? "

" आता ? आतां नग. कटाळा आलाय् लई. गानं म्हणायची असलीस तर म्हन बापडे. " आजोबांनी चुना तंबाखूची बुकणी तोंडांत सोडली आणि या अंगावरून त्या अंगावर वळत राधिका येते आहे की नाहीं म्हणून माडीकडे पाहिलं.

गाण्याचं नांव निघतांच राधिकेला मास्तरांच्या चिठीची आठवण झाली. ' अय्या ! त्यांना कसं गाणं म्हणून दाखवायचं ? आणि हें कळलं तर ती शकी मला किती चिडवेल ठाऊक आहे ? नको ग बाई ! ' लाजत मुरकत

राधिका माडीवरून खाली आली आणि माथ्यावरचा पदर नीट सावरीत आजोबांना म्हणाली, " कसलं गाणं म्हणू म्हणतां ? "

" भजन म्हन की एकांद ! "

" त्यापेक्षा एक नाटकांतील पद म्हणू का ? पोरांना शिकवायचच, तेव्हां आयती तयारी तरी होईल. " मास्तराच्याबद्दल आजोबाच मत ठीक असावं या भावनेनं राधिकेन अधीरतेनं आजोबाच्याकडे पाहिल. पण आजोबांच्या थकलेल्या चेहऱ्यावरच्या सुरकुत्या पसरल्या. त्यानी कांही तरीं आपण निराळंच ऐकतों आहोत या भावनेनं तिला प्रश्न केला, " नाटकांतलं मर्जी ? "

" शाळेत मास्तरांनी लिहिलेलं नाटक मुलं करणार आहेत आणि मी मास्तरांच्याव म्हणण्यावरून त्यांना त्यातील गाणी शिकवायच कबूल केलय् ! " खर होत ते राधिकेन सांगून टाकल. पण त्यामुळ आजोबांच्या अंगाचा भडका उडाला, " अबागलीस काय कार्टे ! न्हाई न्हाई तें सुचाय लागलंया ! देवान गळा बरा दिला त्येचा हचो उपेग व्हय ! आन् तुला हचें सागाय मास्तर कवा आला वता ? "

" आजोबा ! " राधिका दचकली, घाबरली. पण तिकडे लक्ष न देतां तिच्याकडे बघून दात ओठ खात आजोबा सतापून ओरडले, " टांगडं फासटून टाकीन आजपसन त्या मास्तरचं असं काय ऐकाय लागलीस तर ! त्यो सागतूया आन् ही भवानी त्येचं ऐकून लगीच गानं म्हनाय निगालीया काय ? आईबा आन् मी मेलों न्हाई म्हणावं अजून तुला अशी रिकामी सोडायला ! "

इतक्यांत झेल्यानं तिला अंगणांतूनच हांक दिली, " आक्का ऽऽऽ मी गाणीं घेऊन आलों ग ऽऽऽ आताच्या आतां शिकीव आम्हाला चाल कशी मस्त लावली पाहिजेस ! " आणि तो तोंडानं शीळ वाजवीत घरांत घुसला नाही तोंच आजोबांनी आपल्या हातानं त्याला धरून बाहेर घालवीत दरडावलं, " आल्या पावलीं चालता व्हो माझ्या म्होरन ! पुनाच्यान दिसलास तर याद राकून आस ! "

○ ○ ○

: ७ :

कासराभर दिवस वर यायच्या आधींच शेवतीआक्कांनीं दहावीस भाकरीची चवड चुलीच्या कट्ट्यावर ठेवली आणि तिच्याकडे बघून चारपांच चिपाड चुलीत सरकावीत निराशेनं म्हटलं, ' ह्या भाकरीच्या चवडीवानीच जल्मांतली बावीस वर्ष चवड करून बसल्याती ! ... यील तें वरीस ह्या भाकरीवानीच सारक येतया त्येचबी डोळ उगडनातीं आन् बाबास्नीबी मनातली आडी कमी करूसी वाटंना. सगळ्याचं बेस हाय; पर माजा मातूर इच्यार कराया कुनालाच फावना ! '

काटवटीतील भाकरीच्या पिठात उजव्या हातानं पाणी घेऊन तें पीठ मळायला सुरवात करतांना शेवतीआक्काना मनाचा कढ आवरतां येईना. त्या पिठाप्रमाणच सगळ्या भावनाचा चोळामोळा होतो आहे असं त्याना वाटलं. मळून मळून भाकरी घडायला तयार होणाऱ्या पिठासारख आपलं मनहि घट्ट होईल अशी त्यांची कल्पना होती, ती खोटी असल्याची त्याना जाणीव झाली. भाऊ भावजयीच्या ससारांत आपला जीव रमला आहे या समजुतीखाली वडिलांच्या संगतीत सुखात आहे असं मानणारं आपलं मन आज एकदम बंड करत आहे असा त्याना भास झाला. वैतागाच्या भरांत घडलेली भाकरी धाप्दिशी तव्यांत टाकतांना त्या पुटपुटल्या देखील, ' सारा जन्म नुसताच चुलीत गेला ! काळीज करपून करपून धुल्ला झालं. पर कुनालाबी दकल घ्यावीशी वाटली न्हाई '

आणि तसा विचार केला तर तें खरंहि होतं. आजोबानी लेकीला जन्मभर सुखाची सावली मिळावी म्हणून त्यांच्या समजुतीन सोन्याचा धूर निघत असलेल्या घरात शेवंतीआक्कांना दिल होतं. टोलेजंग वाडा, नजर पोंचस्तोवर जमीनजुमला, वाडवडिलांपासून पोराबाळानी भरलेलं नांदतं घर आणि चार माणसांत नांव काढणारे पै पाहुणे अशी जागा बघून लेकीला दिली, या नादांत आजोबांचा पाय जमिनीवर ठरत नव्हता. त्यामुळं सुखाचं गाठोडे हातांशी आलं याच आनंदांत पहिल्यांदां शेवंतीआक्कांनीं

सासरी पाऊल टाकलं. पण चार सहा महिन्यांच्या आंतच नशिबाचा फेरा बदलला ! ओठाशी आलेला अमृताचा घोट गमावणार की काय याची धास्ती त्यांना बसली.

एक दिवस तिसऱ्या प्रहरी विठोबा घरांत आला, ते अमूक एक ऐक, नाहीतर नरडीचा घोट घेतो अशाच थाटांत ! आपल्या डोक्यावरचा रेशमी फेटचाचा शेमला पाठीवरून उजव्या बाजूनं रुबाबात पुढ टाकीत त्यानं शेवंती आक्काना म्हटलं, “ अंगावरचा फुटका मणी विकून आत्ताच्या आत्ता माझ्या म्होर आला तर बर हाय, न्हाईतर..न्हाईतर हू म्हणायच्या आत हुतीस का न्हवतीस करीन ! ”

या अनपेक्षित धाकानं शेवतीआक्का घाबरल्या भीतीनं त्यांच सर्वांग थरथरूं लागलं. तोंडाची बोबडी वळून गेली. विजेच्या वेगानं त्या चार पावलं मागें सरकल्या. पण त्याचा परिणाम भलताच झाला. दोन्हीं हातांनी त्याचं नरड घट्ट आवळीत कुणालाही काही सागणार नाही या अटीवर विठोबान त्याच्याकडून सगळे दागिने घेतले आणि तो निघून गेला. मोठ्या दिमाखान खात्यापित्या घरात आलेली ह्या लक्ष्मीची पावलं एकाएकी मंदावली पोटांत मावणार नाही एवढं सुख आहे या नादात उमलत चाल-लेली शेवती कोमेजू लागली.

“कसली मेली पाढऱ्या पायाची कुणाला म्हाईत ! ही घरात आली नि पोरग भाईर गेलं” शेवती आक्काच्या सासूबाईनीं तोड सोडल. त्यांना पहातांच कानशिलावर मायेनं मोडणारी तिची बोटं दांतओठ खात कडाकड मोडू लागलीं. शेवंती आक्कांच्या काळजाला जोराचा हादरा बसला. सारं घर त्याच्या उलट फिरूं लागलं.

आणि मग एक दिवस ‘आनीक योक ल्योकच हाई म्हन संबाळीन माज्या लाडकीला ’ अशा स्वाभिमानाच्या ग्वाहीबरोबर आजोबांनीं शेवंती-आक्कांना कायमचं माहेरी आणलं ! त्यानंतर स्वप्नांत दिसावा त्याप्रमाणंच विठोबाचं चुकून केव्हांतरी ओझरतं दर्शन त्याना घडलं इतकंचं. पण काही झालं तरी ससाराची ओढ त्यांच्या मनांतून कमी झाली नाही.विठोबा भेटावा त्यानं आपल्याला न्याव, एखाद्या मुलाच संगोपन करण्यांत हाडाची काडं

व्हावीत ही भावना त्याच्या हृदयाला स्पर्श केल्याशिवाय राहात नव्हती. त्यामुळच परवां विठोबा न्यायला आला असतां आजोबांनीं त्याला हाकललं म्हणून त्यांचं काळीज आणखीनच पिचून गेलं होतं.

हातांत हिरवा चुडा भरला आहे, अंगावर हिरवी रेशमी चिरडी आहे, गळयात दागिने भरपूर घातले आहेत, गालावर तीट लावली आहे.डोळयात काजळ माखलं आहे आणि तोंडावर लाज मावेनाशी झाली आहे, अशा नव्या नवरीच्या थाटांत पहिल्यादा शेवतीआक्का घरी गेल्या त्या वेळी विठोबानं त्यांच्याकडे इतक्या आनदान पाहिलं होत की, ती नजर त्या केव्हांच विसरूं शकत नव्हत्या. त्यांना तो हवासा वाटत होता आणि नशीब त्यांना त्याच्यापासून एकसारख माग खेचीत होत !

मनाची आग विझत नव्हती. पोटांत आगडोंब उसळला होता. " माझ्या परास दुसऱ्या हृया सगळयाच्या वाटणीला असल नशीब घालायला देवाला सुचलं असतं तर बेस झालं नसतं ? डोळे फोडून बसलावता काय भाडू तवा मलाच नेमकीला उचलली ? ' शेवती आक्कांच्या मनाचा तोल सुटला. राधिकेच्या सुखासाठीं रात्रदिवस घडपडणाऱ्या मनांत भलतीच भावना डोकावून गेली, ' हिच बी हूं दे न्हाईतर माज्यासारकच ! लई उडचा मारतीया ! ' पण त्याच क्षणाला त्या एवढयांदा दचकल्या कीं तोल जाऊन त्या चुलीशी कोलमडल्या.

" आत्याबाई ! " राधिका घाबरून पुढं धांवली. तिनं शेवती आक्कांच्या हातांतील अर्धवट घडलेली भाकरी काटवटीत फेकून देऊन त्यांना चुलीपासून मागं ओढलं तों शेवती आक्कांच्या हाताला तव्याचा मोठा डाग पडला होता.

" फार भाजलं का ग ? " राधिकेनं अधीरतेनं चौकशी केली. तो डाग बघून तिच्या काळजांत लकलकल. तिला भीति वाटली म्हणून तिनं तिथं फुंकर घातली, तेव्हां शेवंती आक्का तिला पोटाशी धरीत एवढच म्हणाल्या, " हातावरचा डाग कसाबी निगल आज उद्यां. पर काळजावर पडल्याला मातूर आतां निगायचा न्हाई ! "

इतक्यांत शकुंतलेची हांक दरवाजांतून आली म्हणून राधिकेनं घाई-

घाईनं शेवंती आक्कांना विचारलं, " असं कां म्हणतेस ग ? मला नाहीं का सांगायच ? " पण तेवढ्यात शकुतलेन सैंपाकघरात पाऊल टाकल्यामुळं शेवती आक्का एक दीर्घ उसासा टाकीत म्हणाल्या, " न्हान हाईस तू अजून. तुजा जीव असाच माज्या म्होरं सुकात लोळू दे. शकने, दोगीजनी मळ्यात जाऊन भाकरी दिऊन या, जावा बर शिरपूची एवडी. "

शेवती आक्कांनी मोठ्या शिताफीनं विषय बदलला हें ध्यानांत येऊनहि राधिका गप्प राहिली. शकुतलेसमोर घरांतील गोष्टी निघू नयेत असं शेवती आक्कानी तिला मागेच दोनचारदां बजावल होत. त्यामुळ अगदी नाइलाजानं तिन आपली उत्सुकता मागें खेचली आणि चुलीवर ठेवलेली भाकरीची चवड घेऊन शेतावर न्यायच्या न्याहरीची तयारी केली.

" शके, मोठ्या माणसांना पण त्रास होतो का ग कधी कधी ? " घर सोडून रस्त्याला लागल्याबरोबर राधिकेन शकुतलेकडे काहीशी कुतुहलानं चौकशी केली.

" कशावरून म्हणतेस ? " राधिकेच्या प्रश्नाचा रोख नीट ध्यानांत न आल्यामुळ शकुंतलेन तिच्याकडे आश्चर्यान पाहिलं.

"पण मला अस वाटतं. केव्हां केव्हां आमच्या घरांतील मोठी माणसं मनाला होणारा त्रास बोलून दाखवीत नाहीत; पण गप्प गप्प असतात, नाहीं तर रागावतात तरी ! त्यांना ती आपल्याला बोलतात, रागावतात तसं धाक देणार कुणी नसतं, तरी का ग कुदतात ती मनातल्या मनात ? "

" कां ? काही बोललं वाटतं आज ? "

" नाही ग ऽऽ पण आपली विचारतें. "

" शक्य आहे बाई ! माझी आई परवां म्हणाली कीं तुझ्या आत्या-बाईला फार काळजी असते म्हणून ! खरं का ग ?"

" तें नेमकं माहीत नाहीं. पण तिचं मन तिला खात असावं असं मात्र वाटतं बाई. "

". जाऊं दे ग ! मोठ्या माणसांच्या फंदांत कशाला पडा आपण आणि आपल्याला थोडंच कुणी कांहीं सांगायला बसलंय् ! बरं तुझं त्या गाणीं शिकवायच्या कामाचं कुठवर आलं ? "

शकुंतलेनं राधिकेचा हात आपल्या हातांत घेतला आणि आनंदानं तो मागें पुढें करीत खटयाळपणान तिच्याकडे पाहिलं. पण राधिका लाजण्या-ऐवजी अगर हसण्याऐवजी गभीर झाली. त्यामुळं कपाळावर आश्चर्याची रेघ ओढीत शकुतलाच पुन्हा म्हणाली, " म्हणजे ? मास्तरांनी गाणीं लिहून दिली नाहीत की काय ? " तरी पण निराशेनं खाली मान घालीत राधिका गप्प गप्पच पुढं चालली. तिनं असं का करावं याचा उलगडा झाला नाही; म्हणून रस्त्यावरच्या एका झाडाच्या बुध्याशी जाऊन तिथं बसत शकुतलेन आणखी एकदा बोलून बघाव म्हणून म्हटलं, " मी म्हणू का एखाद गाण नाही तर ? "

" तू ?" शकुंतलेला गाण फारसं येत नव्हतं हे माहीत असल्यानं तिनं गाण्याचं नांव काढतांच मंदस्मित करीत राधिकेन तिच्याकडे रोखून पाहिलं, तेव्हां मात्र खूप मोठ्यानं हंसून तिथून दूर पळून जात शकुंतला म्हणाली, " मास्तरांच गाणं तुला माहीत नि तुझ त्याना माहीत ! पण माझ मात्र खास तुझ्यासाठी रचल गेलंय् ! ऐकून घेशील ? " आणि तिनं एक खडा उचलून राधिकेच्या अगावर फेकला. पण त्याच क्षणाला मास्तर समोरून सायकलवरून येत असल्याचं दिसतांच जीभ चावून ती चटकन खाली बसली आणि राधिकेला उद्देशून ओरडली, " एवढा वेळ बसलेली दांतखिळी आता उघडलीस तर मात्र माझ्याशीं गांठ आहे म्हटल ! . . . ."



## : ८ :

" माणसानं एखाद्याला जें पत्र लिहिलेलं असतं तें त्या माणसाकडून उत्तर यावं म्हणून, असं नाहीं का तुम्हांला वाटतं ? " राधिकेच्या हातां-तील शिदोरीकडे पहात मास्तरांनीं तिला सरळ विचारलं. झेल्याच्या हातीं तीनचार दिवसांमागें त्यांनी तिला एक चिठी दिली होती. पण तिच्याकडून

उत्तर आलं नाहीं ही गोष्ट त्यांच्या मनाला खटकली होती आणि म्हणूनच तिची कधी गांठ पडली की तो प्रश्न विचारायचाच अस त्यानी मनाशीं ठरवून टाकल होत. ती संधि आता आयती चालून येतांच त्यांनी तिचा चटकन् फायदा घेतला.

पण त्यावर कांही उत्तर द्यायच्या आधीं राधिकेनं नुसती मान वर केली. तिची आणि त्यांची दृष्टभेट होताच मात्र चटकन् आपली नजर खाली वळवीत तिनं म्हटलं, " सगळ्याच पत्रांना थोडीच उत्तर द्यायचीं असतात ? "

" कां ? माझं पत्र उत्तर देण्यालायक नव्हतं असं तुमचं म्हणणं ? उलट मी असा प्रश्न विचारला होता की, होय नाही हे तुमच्याकडून कळण जरूरीचं होत आणि आहेहि ! "

" तें खरं. पण . .पण माझी समजूत होती कीं, मी न लिहितांहि त्याचं उत्तर तुम्हांला मिळालं असावं ! " राधिकेन माथ्यावरचा पदर पुढ ओढला आणि शकुंतलेकडे नजर वळवली. पण तिच्या बोलण्याचा रोख मास्तरांच्या ध्यानांत न आल्यामुळ ते गोंधळून गेले. त्यांनी कांहीसं आश्चर्य व्यक्त करीतच तिला विचारलं, " मी नाही समजलों याचा अर्थ ! "

" अगदीं साधं नि सोपं तर बोललें मी मास्तर ! न कळण्यासारखं त्यांत कांही आहे असं मला नाही वाटत. "

" मग गाणी शिकवणार मुलांना तुम्ही असं धरून चालतों मी. " मास्तरांनीं आपल्या पद्धतीन त्या वाक्याचा अर्थ लावला आणि ते हंसले.

" मास्तर ! ते शक्य नाही !" राधिकेनं खाली मान घातली.

" म्हणजे ?"

" घरची परवानगी नाहीं ! " राधिकेनं खरं होतं तें सांगून टाकलं आणि डोळ्यांत जमा होत चाललेली आसवं मास्तरांना दिसू नयेत म्हणून बाजूला मान वळवली. पण मास्तरांच्या नजरेतून ही गोष्ट सुटली नाही.

" तुम्हांला रागावलं का कुणी त्याबद्दल ? " मास्तरांनीं आपली शंका बोलून दाखवली तेव्हां खालचा ओठ दांताखाली घट्ट आवळीत राधिकेनं

नुसती मान हलविली. पण आंतून आलेला कढ तिला दाबून धरणं अशक्य झाल्यानं तिनं अस्फुट हुंदका दिला.

" हें काय भलतच राधा ? " राधिकेच्या दुःखाचा उगम न कळल्यामुळं मास्तर आश्चर्यानं थक्क होऊन गेले. इतक्यांत शकुतला तिथं येत म्हणाली, " हें ग काय ? रडतेस होय ? मास्तर, आज हिला कांहीतरी झालय् बघा. दिवसभर अशीच आहे ! सागा तुम्ही काही. बघू तुमचं तरी ऐकते का! "

" शके, गप्प बस हं ! " राधिकेनं पदरान डोळे टिपीत शकुंतलेवर एवढाला एकेक डोळा केला त्यामुळं मास्तर आणखीनच गोंधळून गेले. त्यांना कशाचाच उलगडा होईना आणि अधिक कांही विचारायला त्यांचं मनही धजेना ! शेवटी इथं फार वेळ थाबण ठीक नाही या कल्पनेनं ' जातों मी ' असं सांगून ते निघून गेले.

" झालं आता ठीक ? " शकुतलेनं थोड रागाऊनच राधिकेकडे पाहिलं. मास्तराच्या देखत तिनं डोळचात पाणी काढायला नको होत अशी तिची समजूत. त्यामुळच ती तिच्यावर खूपशी चिडली आणि म्हणाली, " माणसा-माणसांतील फरक कळायला देखील अक्कल लागते ! काय म्हणाले असतील बरं ते तुझ्या ह्या कर्तबगारीला ? भित्री भागुबाई ! इश्य ! "

" शके ! " राधिकेला अजूनहि हुदका आवरत नव्हता. तरी पण मोठ्या जिकिरीनं तो गिळून टाकीत ती एवढच म्हणाली, " आपल्या जिव्हाळ्याची माणस भेटली म्हणजे सुख जसं पोटात मावत नाही तस दुःखही मावत नाही ग. "

" अस्सं ! आणि आपल माणूस भेटल्यावर अस रडल म्हणजे त्याच्याजवळ आपली शोभा झालेली शोभून दिसते म्हणायची मग ! माणूस आपलं झाल म्हणून रडायच त्याच्यासमोर ! मला हे मुळीच खपायचं नाही ! पुन्हा अस कांही दिसल तर थोबाडीत ठेवून देईन."

राधिका शकुतलेच्या या धमकावणीनं तिच्याकडे पहातच राहिली. हळुहळू तिचे डोळे तारवटून गेले आणि गालावरचे अश्रू पुसट होत गेले.

" मला काय वाटतंय् हें तुला नाहीं ग कळणार ! आजोबा—होय आजोबांनी नाही नाही ते बोलून घेतलं मला. " राधिकेन झालेली हकीकत

थोडक्यांत शकुंतलेला सांगितली, तेव्हा तीहि थोडी गभीर होऊन म्हणाली, " रागावण्यापलिकडे मोठ्या माणसाना उद्योग काय दुसरा ? जशी काय आमच्या वयाची अशी ही माणसं कधी नव्हतीच ! "

" जाऊ दे. त्याच्या ते ध्यानात आल पाहिजे ना पण ? चल, शेताकडे लौकर जाऊन परतू वेळेवर; नाही तर आणखी–"

" म्हणजे ? "

" घराच्या बाहेर फार वेळ नाही मला रहातां येणार इथून पुढं ! "

राधिकेन विलक्षण गभीर होऊन अस सागितल्यामुळं शकुंतला क्षणभर गप्प झाली. तिच्या या वाक्यान तिला जणू निरुत्तरच केलं !

" तर मग चल अशी घरीच माघारी " शकुतलेनं काहीं विचार केला आणि शेताच्या बाजूला वळलेली पावल घराकडे वळवली. त्यामुळं आश्चर्यानं तिच्याकडे पहात राधिकेन विचारल, " आणि ही भाकरी ? "

" घरी ने ! कुणी भेटल नाही म्हणून साग ! "

" खोट ? "

" मग काय करणार ? नाही तर म्हणाव मास्तर भेटले रस्त्यांत तेव्हा मला काही न सुचल्यान मी तशीच माघारी आले ! अगदी खर खरं तें सांग ! "

" शके ! " राधिका शकुतलेवर चिडली तेव्हा शकुतलेला हंसू आलं. तिनं तिचा हात आपल्या हातात घेतला आणि अवखळपणान तिला आपल्याकडे ओढीत ती शेताकडे पळत निघाली.

इतक्यात झेल्या त्याच्या मागून पळत पळत येत राधिकेला म्हणाला, " इथं शिकवतीस गाण? बाबा नाही तर आत्या कुण्णी कुण्णी नाहीं इथ ! "

जो प्रश्न जाणूनबुजून राधिका टाळीत होती तो तिची पाठ सोडीत नव्हता. तिला नको होत तेच पुढ्यात येत होत. म्हणून ती पुटपुटली, " माणसाला हव ते मिळत नाही आणि नको ते सुटत नाहीं ! "

त्यावर शकुंतला मोठ्यादा हसली आणि म्हणाली, " छे ! चुकलीस; गाणं हवय् तुला तें तुझ्यासाठीं नसून मास्तरांच्यावर इम्प्रेशन मारायला ! पण तें जमेना ना! "

" शके, फाजिलपणा बस्स झाला हं ! " राधिकेन शकुतलेच्या पाठीत धपाटा घातला, तेव्हां झेल्यानं तिला विचारल, " म्हणजे आम्हां पोरांच्या-सारखं तुम्ही मोठ्या मुली पण मारामारी करता म्हणायच्या ? आमची आई म्हणते, पोरीची जात दंगा नाहीं करीत ! "

त्यावर शकुतलेनच उत्तर दिलं, " पोरीची जात करील ढीग; पण तिला करूं द्यायला पाहिजे, नाही ? तुला काय पाहिजे तेवढं बोल; बाकीची बड-बड नको इथं ! कोणत गाणं पाहिजे ते ही शिकवील ! त्याच्या बऱ्यावाई-टाची धनीण व्हायला मी तयार आहे ! "

पण तिच्या या बोलण्याला विशेष अर्थ नव्हता. वोलून चालून त्या खेड्यांतील मुली. मराठी सातवी पास झालेल्या, म्हणजे चार लोकांनी कौतुक करण्यासारखी कामगिरी त्यांनी केलेली. चार पुस्तक त्यानी वाच-लेली म्हणून इतर बायकांच्यापेक्षां त्यांची जीभ वळवळत होती. आहेत लहान अजून म्हणून घरची माणस स्थळांच्या शोधात असली तरी लाडानं त्यांच्या भावनाना शक्यतो दुखवीत नव्हती. त्याचा अर्थ त्या मनाला येईल तसं वागायला लागल्या, तर तें कोणीच खपवून घेणार नव्हतं. उलट तशा वागण्यामुळं त्यांना घराच्या बाहेर पडायची बंदी व्हायला वेळ नव्हता, याची चुणूक राधिकेला पटली होती. पण शकुतलेला अजून तसा अनुभव आला नव्हता ! आणि त्यामुळच तिची जीभ थोडी सैल पडत होती.

आणि तस करता येत नव्हतं म्हणून राधिका खट्टू झाली होती तिचं मन तिला खाऊन घेत होतं. घरांतील माणसं वाईट आहेत याच एका भावनेनं तिला पोखरल होत.

झेल्या तिच्या भावाचा–किसनचा–अगदीं लहानपणापासूनचा दोस्त म्हणजे तिला भावासारखाच. अगदीं लडिवाळपणानं तो आजवर तिच्या भोंवतीं भोंवती करीत आलेला आणि तिनंहि त्याचे लाड किसनच्या इतकेच पुरवलेले. पण आजोबांनीं त्याला घराच्या बाहेर हाकलल्यामुळं त्याच्या इतकंच हिलाहि दुःख झालेलं ! आपल्यासाठी त्याला ही भयंकर शिक्षा झाली या कल्पनेनं दोन दिवस ती बेचैन झालेली; पण जिवाची घालमेल होऊन सगळं गिळण्यापलिकडे तिला उपाय सुचत नव्हता आणि त्यामुळं

इच्छा असूनहि मास्तर भेटले की, खूपसं बोलायची तिची कल्पना पार मावळून गेली होती. आपणहून चालून आलेल्या संधीचा तिला अजिबात फायदा झाला नव्हता. त्यामुळ ती आणखीनच नाराज झाली होती आणि म्हणूनच शकुंतला कितीहि म्हणाली तरी तिनं झेल्याची समजूत घातली, " मास्तराना म्हणावं कीं, जो गाणीं रचतो त्यालाच त्याची खरी चाल येते ! ते शिकवतील तुला उत्तम. माझी खात्री आहे. तू जा नि सांग त्यांना मी असं म्हणालें म्हणून ह ! "



: ९ :

" आला आला रुखवत, त्यात रुपये हुत बारा, यीन मागती हाराडेरा, तिथं एक रुपाया खरचला, रुपय उरलं आकरा, यीन मागती बकरा, तिथं एक रुपाया खरचला. रुपय उरल धा, यिनीला करनी पहा, तिथं एक रुपया खरचला. रुपय उरल नऊ, यीन मागती घऊ, तिथं एक रुपाया खरचला. रुपयें उरले आठ, यीन मागतीया ग्वाट, तिथं एक रुपाया खरचला. रुपय उरलं सहा, यिनीबाईची करनी पहा, तिथ एक रुपाया खरचला. रुपय उरल पांच, यीन मागतीया माच, तिथं एक रुपाया खरचला. रुपय उरलं चार, यिनीचं आलं च्वार, तिथं एक रुपया खरचला. रुपय उरलं तीन, यिनीची आली भन, तिथं एक रुपाया खरचला. रुपय उरल दोन, यिनीच आल कोन, तिथं एक रुपाया खरचला. आतां रुपाया उरला योक, यिनीचा आला ल्योक आन् मग तिथ एक रुपाया खरचला. असं रुपय बाराच्या बारा आटलें ! मग मातूर इवाय पावन रागराग उटलं, इवाय गेल बंदरा, तेनी रुपय आनलं पंदरा, पंदरा रुपयची आनली ठुशी, यिनीबाईच्या मनाची झाली खुशी, आनिक मग बाइसाब आल्या मांडवापशीं आन् श्यास भराय गेल्या बावल्यापशी !—अशांतली एकांदी नको रे बाबा हुडकूस ! "

शेवंती आक्कांनीं हंसत हंसत श्रीपतीजवळ राधिकेच्या लग्नाची गोष्ट सहज काढली. त्याला ही विहीणबाईची भानगड ऐकून फारच हंसूं आलं.

त्यामुळं राधिकेची आई कमळाबाई या बहिण-भावांच्या पुढ्यात भाजलेल्या शेंगा आणि भातवडी देत म्हणाली, "त्यास्नी कशाला सांगतां दिवानसाब? तुमी मस्त खंबीर हाय्सा.तुमची भाची आन् तुमी आपलं काय बी बगून घ्या."

" चांगल ! मंजी वाइटाची धनीन मी आन् तुमी सगळी नामानिराळी."

" तसंच झालं असत. पर देवानं तुमची कूस उजवाय हवी हुती ! नशीब नग ? " कमळाबाई अगदी सहजगत्या बोलून गेली तिचं म्हणणं होतं की, शेवती आक्कांच्या मुलाला आपली मुलगी देऊन जुना सोईरसंबंध नव्यान घट्ट केला असता. पण शेवंती आक्कांना आपल्याला मूलबाळ नसल्यान ती टोचून बोलली या भावनेनं भलताच राग आला. त्या रागाच्या भरांत त्या फाड्दिशी बोलून गेल्या, " लई हिनीवलं मजी शानपन दिसतं का काय मानसाचं ? त्या परास आमच्या ससारात तुमी मदी नगो म्हन की सल्ली ! " आणि फणकाऱ्यानं उठून आंत गेल्या. बिचारी कमळाबाई भलतीच ओशाळली. आपण बोललो काय आणि त्याचा परिणाम झाला काय याचा पडताळा मनाशी घेतांना तिला चांगलाच पस्तावा झाला. ती आचारी की बिचारी होऊन गेली.

शेवंती आक्कांना माहेरी आणल त्याच वेळी आजोबांनी कमळाबाईला श्रीपतीच्या देखत बजावल होत, ' हिला एका अक्षरानं बोलशील तर जीभ हासडून टाकीन ! हचें घर मी जित्ता हाई तंवर माजं हाय. हितं कुणाच्या बाची मिजास चालणार न्हाई. माजी लेक काय करील ते गुमान खपवून घेत जा ' आणि त्याला श्रीपतीनंहि दुजोरा देत म्हटल होतं, ' आक्का मंजी मोठा भाऊच हाय माजा. आमी दोगं बी ह्या इस्टेटीच मालक ! तिला इच्यारल्या बिगार पान हालायचं न्हाई घरांत. तिच्या काळजाला धक्का लावील त्यो दुसऱ्या रक्ताचा !! '

कमळाबाईनं शेवंती आक्कांचं मन दुखावलं म्हणून श्रीपतीच्या अंगाचा भडका उडाला. त्यान शेवंती आक्का फणकाऱ्यानं निघून गेलेल्या पहातांच कमळाबाईकडे संतापून पहात म्हटलं, " हां ! हिकडचं थोबाड हिकडं हुईल अशा बडबडीनं ! गप हाय तंवर हाय. गुमान पाया पड जा तिच्या चुकी झाली म्हणून ! "आणि तोहि शेवंती आक्कांच्या मागोमाग आंत निघून गेला.

शेंगा आणि भातवडी जाग्यावरच राहिली! तोंडांतला घास काढून घेत-ल्याच दुःख कमळाबाईला झाल. आजोबांना हें कळलं तर डोक्यावर केस रहाणार इतका बेदम मार बसण्याची शक्यता होती हे तिच्या ध्यानांत येताच ती धांवत नणदेकडे गेली आणि शेवती आक्काच्या पायावर लोळण घेत म्हणाली, "चुकू नये तें चुकलं! पोटांत घाला चुकी आन् पदरांत घ्या! माज आई बा ह्या घरांत तुमीच "

" वैनी! " शेवंती आक्का गहिवरल्या त्यांनी भावजयीला पोटाशीं धरली आणि मग मनसोक्त रडून घेतलं. त्या रडण्यानं पोटातली आग शांत झाली, मनाचा कढ ओसरला. हलक्या आवाजांत भावजयीशी कान-गोष्ट करतांना तिचं तोंड आपल्यासमोर दोन्ही हातांनी धरीत त्या म्हणाल्या, " पोटजाळ लई वगाळ! एकाद तरी प्वार झालं असतं तर नसता जीव खाल्ला एवडा! माजं नशीब फुटकं आन् तुजी चुकी कसली? तुज्या तोंडान नशीब बोलल वैनी! " त्यामुळं कमळाबाईचा जीव खालीं पडला. आपल्या पदरानं नणदेचे डोळे पुशीत ती एवढच म्हणाली, "तुमच्या शब्दाशिवाय उतरडीच गाडग उतरलं न्हाई, का चुलीवरच्या तव्यात भाकरी टाकली न्हाई म्यां! अस असतांना नशिबाची गोष्ट कां काडता? आमी हाय न्हव तुमास्नी! माजी पोरगी तुमचीच हाय म्हन समजा. न्हानपना-पासन तुमच्याच वटचांत वाडली ती " आणि सैपाकघरात निघून गेली.

पण शेवती आक्कांच्या मनाची अस्वस्थता तिच्या या बोलण्यानं अधि-कच वाढली. दोन्ही हातांनी आपलं तोंड पुशीत आणि दंडावरच्या चोळींत खोचलेला रुपाया दीड रुपाया नीट दुमडून बसवीत स्वतःशीच म्हणाल्या, 'नुसत समजून नात्याची तान भागत असती मंजी दुनियातली लई माणसं नशिबवान ठरली असतीं! राधी माजी हाय, पर नुसती म्हनायला! तिचं रगात माज्या रक्तानं वाडलं न्हाई. माज्या मनाची शांति होस्तोंवर तिनं माजं थान वडलं न्हाई आन् नऊ म्हईन्याचं तिचं वज्ज माज्या कुशींत बाळिगलं न्हाई म्यां आन् माजा तिच्यावर काय हाक्? तिच लगीन केलं तरी यीन इवाय याची ही दोंग, मी आपली उठाठेवीची मालकीन. जल्माला कष्ट लगीनगाठ बांदूनच आलंया जसं काय! कुनाचा भाऊ आन् कुनाची

भावजय ! बाबांची मर्जी हाय तवर तळातांत झेलत्याती आन् उद्यां ही सावली मावळली की, घराच्या भाईर हो म्हनाय् हयेच कमी करनार न्हाईत, हें दकल हाय मला ! '

क्षणभर शेवती आक्का आपल्या दुःखाच्या गोष्टींत चूर होऊन गेल्या. पण मग थोड्या वेळातच त्यांच्या मनांत आशा डोकावली, ' राधी आपली काय आन् आपल्या भावाची काय सारकीच. लेक नसली तर भाची तरी हाय आपली. लेकीचं कोनबी करल म्होरं हून. पर हिचं म्या केल तर चार मानस म्हनत्याती की, आत्तीची माया लई खुळी पोरीच्या म्हनून ! तें काय न्हाई. पोरगीला चागला शिकल्यालाच न्हवरा करायचा. हिकडची काडी हिकड कराय नको माज्या पोरीन ! डोळ्यात कसं सुका समाधानाच पानी नाचल पाइजे तिच्या. ' त्यामुळ त्यांनी अगदी समाधानात राधिकेला हांक मारली, " पोरी ऽ ऽ ऽ हिकड ये बगू वाईच ! "

" काय ग ? " आत्याबाईची हांक कानावर जायचा अवकाश कीं हातांतलं पुस्तक बाजूला फेकून राधिका तिथं येऊन पोचली. शेवंती-आक्कांनी तिला जवळ घेतली आणि विचारलं, " पचीम यील आता–तुला लुगडं कसलं आनूं ग ? "

" काही नको मला जा ! सारखी रागावतेस नि कशाला पाहिजे लुगडं ? " राधिका थोडी फुरंगटली. शेवतीआक्का हसल्या आणि म्हणाल्या, " खुळी तर नव्हस ? तू म्हनशील तसलं आनीन. मग तर हाय का न्हाई?"

" काही नको. पंचीम खेळायला मी आतां परकर चोळीतली मुलगी थोडीच आहे ? उठतां बसता लहान आहेस का, लहान आहेस का म्हणून दम भरतेस मला. मोठेपणाचं तरी सुख भोगू दे ना पुरत ! मोठं झालं की, काळीज गुंडाळून ठेवावं लागत हे कळू दे की मला चांगलं ! " तोंडाला येईल ती बडबड करून राधिका तिथून निघून गेली.

आणि त्याच क्षणाला आपल्या खोलीत येत मास्तर स्वतःशींच म्हणाले, ' वय वाढेल तशी माणसाच्या हृदयाचीहि वाढ होत असली पाहिजे. आपल्या एकाकी जीवनांत कुणी तरी हक्काचं यावं असं याच वेळीं कुणी तरी कानांत कुजबुजत असलं पाहिजे खास ! "

मास्तरांना त्या वेळी राधिकेची तीव्रतेनं आठवण झाली. त्या क्षणाला ती जवळ असायला हवी होती हा मोह टाळणं त्याना अनावर झालं. एका शब्दान की क्षणाच्याहि वेगळया वागण्यान तिला अगर तिच्या माणसांना कधीहि दुखवलं नसतांना राधिकेच्या आजोबानी, 'आमच्या पोरीच्या वाटेला जाशील मास्तरा, तर याद राकून आस !' असा दम कां भरावा हें त्यांना कळेना. त्यानीं त्याच्याकडे खुलासा विचारला तर म्हातारा म्हणाला, 'दूधखुळा न्हाईर मी ! तुज्या परास लई पावसाळ बगीतल्याती आन् मला इचारतूस व्हय हृया गोष्टी ? लई बोलत न्हाई मी कवा येळ आली तर मातूर इंगा दावल्याबिगार न्हात न्हाई हृयो फाकड्या.'

मास्तर समजस होते. शिक्षणामुळं येणारा शहाणपणा त्यांच्या ठायीं आला होता. वेळप्रसगी अशा माणसाच्या तोंडाला लागून जिवावरचा प्रसंग ओढवून घेण्यापेक्षा गप्प बसण्याची माणुसकी त्याना माहीत होती आणि म्हणूनच 'तुम्ही काही तरी गैरसमज करून घेतलेला दिसतो आहे !' यापलीकडे ते कांही न बोलता शाळा सुटल्यावर सरळ घरी परतले होते; पण त्याना वेड्यासारखं झाल होत. त्यांच्या मनाला ती गोष्ट फार लागली होती

'आपल्याला कुणी नाही, आपण गरीब आहोंत म्हणून जर कुणी उगाच असं काही बोलायला लागलं आणि आपल्या स्वाभिमानाला धक्का पोचला तर मात्र शेराला सव्वाशेर असल्याची चुणूक दाखविण्याची हिमत आपल्याहि मनगटांत आहे !' मास्तर स्वतःशीच मोठ्यान बोलले आणि कोट काढून ठेवून त्यांनी गार पाण्यानं आपल तोंड धुतल.

मनाची अस्वस्थता वाढली की अलिकडे राधिकेचा शब्द कानावर पडून मन शांत व्हावं असं मास्तरांना फार वाटत असे आणि तसं वाटल की मग ते स्वतःशींच म्हणत, 'याचा अर्थ बायको होऊनच ती माझ्याकडे आली पाहिजे असं नाही. मैत्रिण म्हणून आली तरी समाधान आहे.' पण कां कोण जाणे, तेवढ्यावरच त्यांचे विचार थांबू शकत नसत. त्या दिवशी तिच्या डोळयात तरारलेलं पाणी त्यांच्या नजरेसमोर येई आणि मग ते कासावीस होऊन जात. शकुंतलेसारखी खट्याळ मैत्रिण संगतींत असतांना–

हि ज्या अर्थी राधिकेच्या काजळकडा ओलसर झाल्या, त्या अर्थी तिला विशेष दुःख होत असलं पाहिजे या कल्पनेन त्याच्या काळजांत चर्रर्र होई. त्यांना वाटे, राधिकेला जवळ घ्यावी आणि म्हणाव, 'मी असतांना तुझ्या डोळयात पाणी कस ? ' पण तें शक्य होत नसे. कधीच शक्य न होणारी ती गोष्ट होती. त्यामुळ ते वेडयासारखे एकटेच तासन् तास विचार करीत. राधिकेनं आपल्याजवळ मन उघड करायला हव म्हणून त्याच्या ओठावर एखादी दुसरी काव्यपक्ति घोळू लागे.

' का मौन तुझे गे सांग ना । साजणी कर उघड मनीच्या खुणा ॥'

पण तरीहि त्यांचं मन हलकं होण कठीण जाई आणि आज तर या सगळया मर्यादा ओलांडून त्यांचं मन धावत होतं. राधिकेजवळ आपल मन उघडं करायची इच्छा त्याच्या मनांत विशेषत्वानं डोकावली होती कसल्या तरी भलत्या विचारानं त्यांच्या मनाला लागलेली हुरहूर कांही केल्या बाजूला होत नव्हती आणि म्हणूनच आपल्या कोरडया ओंठावरून जीभ फिरवीत कुठ तरी लाबवर पहात ते पुटपुटले, ' राधा, बायकांच्या भावनांना आसवांची झालर मिळते; पण पुरुषाच्या भावनांना आतल्या आंतच घुटमळल्याशिवाय मार्ग नसतो. तुझ्याप्रमाणं माझ्या दुःखाला वाचा फुटली नाही याचा अर्थ मी तुझ्यापासून दूर निघालो आहे असा मात्र करून घेऊं नकोस. '



## : १० :

वाऱ्यानं लोटलं गेलेल खिडकीचं दार नीट उघडीत राधिकेनं बाहेर नजर टाकली तो मुसळधार पाऊस पडत होता. रस्त्यावर पाणीच पाणी झालं होतं. आभाळ फुटल्याप्रमाणं सरीवर सरी कोसळत होत्या. रस्त्यावरचं माणूस दिसू नये इतकी झिम्मड पावसानं उडवली होती.

पन्हाळीखालच्या पाण्याखालीं हात धरतांना राधिकेच्या मनांत आलं, ' या पावसांत खुशाल भटकावं आणि डोकं शांत शांत करून टाकावं.

वाटलं मनाला बरं, तर खुशाल खळखळत्या पाण्याच्या लोंढ्याबरोबर पुढं पावल टाकावीत ! दूर दूर जाऊन मास्तरांना अखेरच पत्र लिहाव; त्यांचा कायमचा निरोप घ्यावा; सगळ्यांचाच अखेरचा निरोप घेऊन टाकावा म्हणजे ही बोलणी तरी नकोत उठतां बसतां खायला ! ' पण तें अशक्य कोटीतील होतं, याची कल्पनाहि मनांत लगच डोकावल्यामुळं पावसाचं गार पाणी डोळ्यावरून फिरवीत ती माग सरकली. डाव्या बाजूच्या आरशात तिला आपलं प्रतिबिब दिसल तिचा उजवा गाल बराच सुजला होता. आजोबानी रात्री दिलेली थप्पड पाची बोटांच्या साक्षीनं तिथ उमटली होती.

' त्याच्याशी नुसती बोललें हा एवढा भयकर गुन्हा झाला ? आणि त्यात मी एकटी असते तर एक असू द्या. शकी बरोबर असतांना देखील इतकं गैर वाटल यांना ! मग एकटी दुकटी त्याना भेटले असते तर यांनीं गोळीच झाडली असती माझ्यावर! ' राधिकेच्या डोळ्यातून पोटांतलं दुःख गळू लागल. तिच्या काळजांत आगडोब उसळून गेला.

कुणी तरी आजोबाना सागितल की, राधिका आणि मास्तर बोलत असतांना पाहिल म्हणून, आणि त्या माणसाच्या चोबडेपणावर भलताच संशय मनात येऊन आजोबानी तिला जोराची थप्पड लगावली होती. एवढंच नव्हे, तर पाऊस पडत होता तरीहि दरादरां ओढीत दरवाजाजवळ आणून त्यानी तिला बाहेरचा रस्ता दाखविला होता ! कमळाबाईन सासऱ्याला गळ्याची शपथ घातली म्हणून काठीचा मार चुकला; नाही तर राधिकेचं सार अंग म्हाताऱ्यान फोकळून काढलं असत !

' एवढी मला आपल्या पोटांत चिरून बसवायला निघालेली आत्याबाई रात्री अर्धांग वायु झाल्यासारखी जागची हलली सुद्धा नाही ! आग लागू दे यांच्या मायेला !' राधिकेला हुंदका आला. मायेची सारी माणसं आपल्यावर उलटल्याचं दुःख तिला अनावर झाल. ' कशासाठी जगायचं ?' तिच्यापुढं मोठा प्रश्न उभा राहिला. आभाळ फाटून कुठं तरी गडप झालं तर उत्तम, या कल्पनेला कवटाळून धरायला ती उतावीळ झाली. पण ' माझ्यासाठी म्हणून तुम्हांला एखादं तरी गाणं शिकवावं लागेल ! "

मास्तरांचा हा निरोप मनाला स्पर्श करून जातांच ती पुटपुटली, 'तुमच्या पायी कितीहि यातना सोसाव्या लागल्या, जन्मांत न खाल्लेला मार खावा लागला आणि प्रत्येकजण मला शिव्या देऊं लागलं आहे, तरीहि तुमच्या-बद्दल मात्र अनादर वाटत नाही.उलट वाटतं,हीं माणसं मायेच्या दृष्टीनं दूर दूर निघाली असलीं तरी तुम्ही—होय तुम्ही—मात्र जवळ जवळ येत चालला आहात ! खरच का तुमच्याशी बोलणं पाप आहे हीं माणसं समजतात त्याप्रमाणं ? '

मास्तरांची आठवण येतांच राधिकेला किंचित बरं वाटलं. सुजलेल्या गालावरचे अश्रू हलक्या हातानं पदरानं टिपीत तिनं विचार केला, 'मास्त-रांशी आपण बोललों, त्यांच्याबरोबर गांवाहून आलों, त्यांचं आपणाला पत्र आल, निरोप आले; पण कधी काही वावग दिसलं नाही. चुकूनहि आपल्यावद्दल त्यांनी ही माणस समजतात तसली भावना व्यक्त केली नाही. किती शांत आणि नम्र माणूस ! किती हुषार आणि समजस ! '

पण मास्तरांचे गुण तिच्या मनांत भरून उपयोग नव्हता ! ते गरीब होते, त्यांना कुणी मायेचं माणूस नव्हतं, हा मोठा शाप त्याना भोंवत होता. आजोबांना आणि शेवतीआक्कांना याच गोष्टी बोंचत होत्या.

' अग, पण मी तरी कधी म्हटलं आहें का कुणाजवळ, मला त्यांच्यांशीं लग्न करायचं आहे म्हणून ? उगाच कां डोक्यात राख कालवून घेतलीय् या लोकांनी ? ' जवळ शकुंतला आहे याच भावनेन राधिका मोठ्यानं आणि चिडून बोलली पण त्यावर शकुंतलेचं उत्तर न आल्यामुळं मग तिच्या ध्यानांत आलं की ती जवळ नाही. तरी पण खिडकीतून बाहेरच्या पावसाकडे पहात तिनं त्या पावसाच्या थेंबांच्या संगतीत निरोप धाडलाच- 'शके, आता तू जवळ हवी होतीस. मला तू कुशीत घेऊन कायमच झोपवा-यला यायला हव होतंस ! ये, कुठतरी लांब लाब मला जवळ घेऊन जा, जिथं कुण्णी कुण्णी नसेल तिथं तू नि मी जाऊं या. तू तरी मला झिडकारू नकोस ! होय, मास्तर नि तू, तुम्ही दोघानी मला कायमचं जवळ केलं पाहिजे. '

तेवढ्यांत कमळाबाई चोरपावलांनीं वर आली. "पोरी, हिकडं कर.

बगू दे, सूज वसारली का न्हाई ?" भरल्या आवाजान तिन राधिकेला जवळ घेतली आणि पळींत उगाळून आणलेल रक्तचंदन लावावं म्हणून तिनं त्यांत बोट घातलं; पण राधिकेला ते मुळींच आवडलं नाही. तिरस्कारानं आईचा हात झिडकारीत तिनं सांगून टाकलं, "तोंडावरची सूज धाळवशील रक्तचंदनान; पण काळजाला आल्याली कशानं जाणार ? मला तुमचं कुणाचं कांही नको. कळलं तुमचं प्रेम ! "

"हाईती नशिबानं घरांत मानसं म्हून बोलत्याती. अंगाला भोकं तर पडत न्हाईत ? आन आपुन काय वाईट केल नाही तर कुणाच्या बाच भ्या हाय ? ,"

"पण तें तुम्हांला कळल तेव्हांची गोष्ट ना !"

"त्यास्नी एक न्हाई कळल, म्हन त्वां तरी कळून गप बसावंस का न्हाई ? शिकलीयास न्हव ! "

"तेंच तर जाचत आहे सगळयाना."

"जाचतया ! कां म्हन जाचायला ? माजा तर जीव फुलून येतो ! "

"येत असेल तर काय ! बोलायला ठीक आहे सगळं. तू जा बघू खाली.' राधिका त्या वेळी कुणाशीच बोलायच्या मनःस्थितीत नव्हती. तिला एकटीलाच एका बाजूला अस बसायच होत. कुणीही तिच्याजवळ यायला तिला नको होत आणि म्हणूनच ती आपल्या आईवर चिडली आणि तिनं तिला तिथून जायला सांगून टाकलं. पण कांही झालं तरी कमळाबाई तिची आई होती. लेकीच्या रागारागानं आपलहि डोकं भडकवून घेणारी ती आई नव्हती. तिन रागावलेल्या राधिकेला अगदी प्रेमानं जवळ घेतली आणि तिचा मुका घेत ती म्हणाली, "पोरांचा रागराग आईच्या पोटांत मावतो पोरी ! माजी शप्पत हाय अशी रडशील तर ! "

"तुझी शपथ ? कशाला घातलीस ही शपथ ? काय उपयोग तिचा ?"

"पोरी, काय म्हन, त्वां तरी बोलत हुषार व्हायाचंस मास्तरांच्या संग!"

"तूहि त्यांतलीच एक. तू कशाला पाठवलंस मला त्यांच्याबरोबर ? तेव्हां नव्हती ही गोष्ट लक्षांत आली ? आणि एखाद माणूस रस्त्यावर भेटल तर त्याच्याशी बोलू नये म्हणजे जुलूमच आहे म्हणायचा ! ते काय बोलले नि मी काय सांगितलं ह्याची चौकशी केलीत एकानं तरी ? "

राधिकेन आईवर आपली रागीट नजर रोखली आणि ती कांहीं बोलायच्या अगोदरच आपलं अखेरच असं बोलण तिन अगदीं कडकपणानं सागून टाकलं, " घरातील कार्टी मेली म्हणून समजा तुम्ही ! वाट फुटेल तिकडे आतां मी जाईन. मला कुणाच्याहि भावनेची कदर नाही आतां ! माझ्या भावना पिचून गेल्या, त्या आतां कधीहि साधल्या जायच्या नाहीत ! तूं मुकाट्यान खाली जा ! नाहीतर माझी शपथ आहे बघ ! "

आणि त्याच वेळी पावसाबरोबरच वहाणाऱ्या जोराच्या वाऱ्यामुळं धाड धाड् वाजणारी खिडकी कायमची बद करून शकुतलेनं राधिकेला एक चिठी लिहायला घेतली–

" राधे,

"किसनकडून घरात घडलेला प्रकार समजला. शाळेला जातांना तो आला होता. त्यान सागितल ते ऐकून काळीज फाटून गेल. पाचसात मिनिटं तर त्या दिवशी मास्तर थांबले असतील; तशात माझी तुझ्या मागं घाई ते चार शब्द बोलले. तू तर तोडही उघडल नाहीस, आणि त्याचं प्रायश्चित्त मात्र तुला या प्रकारान मिळालं ! काय वाटलं कसं सागू ? पण एवढं मात्र नक्की वाटल की, एव्हीतेव्ही ही माणस इतकी रागवताहेतच, तर मग बरीक तू मास्तरांच्याबरोबर लग्न कराव ! माझी समजूत आहे की, ते नाही म्हणायचे नाहीत आणि तूहि ' होय ' म्हणशील. मी एकटी तुमच्या लग्नाला हजर असले तरी काही बिघडत नाही ! अगदी आजच्या आज मी मास्तरानाहि असच एक पत्र लिहून टाकतें. त्यात त्याना स्पष्ट कळवीन की माझी मैत्रीण थोडी भोळी भाबडी आहे, लाजाळू आहे; पण सांभाळून घ्या. तू मात्र मनाची पक्की तयारी कर ह !

"खूप लिहावस वाटतय् ग ! पण मनांतील भावना शब्दांनी व्यक्त होत नाहीत बाई ! थांब, तुझी आता गाठ तर पडू दे खर, म्हणजे मग दाखवते. आणि बरं का, मी येईपर्यंत रडशील तर मात्र माझ्या गळ्याची शपथ आहे ! तुझा हा रडवेपणा मास्तराना देखील खपायचा नाहीं हें लक्षांत असू दे !

—शकुंतला."

## : ११ :

तिन्हीसांज टळून त्या वेळी बराच वेळ झाला होता. शेतावरून घराकडे परतणाऱ्या जनावरांच्या गळ्यातील घुंगुराचा आवाज तुरळक होत चालला होता. त्यांना हाकीत येणाऱ्या गुराख्याची व शेतकऱ्याच्या मुलाची आरोळी हवेंत विलीन झाली होती. नुकत्याच पेटलेल्या चुलीचं घराच्या कौलावर दिसणारें धुराच चिन्ह मावळलं होत. सगळीकडची गडबड, धादल शात झाली होती. नाही म्हणायला गावातील गिरणीचा पुक्-पुकाट तेवढा चालू होता.

चांदण सगळीकडे लख्ख पडल होतं. आभाळात ढगाचा मागमूसही नव्हता. निळ्या शार पड्द्यावर जरीची कलाकुसर अगदी उठून दिसत होती.

अंगणांत येऊन मास्तरांनी मान वर केली आणि आभाळाकडे पाहिलं. असख्य चांदण्या तिथं चमचमत होत्या. एरव्ही ह्याच चांदण्याकडे पाहिलं की अलिकडे शकुतला एकदा राधिकेला म्हटल्याच झेल्या म्हणाला होता, त्याप्रमाणं या चांदण्यापैकी कांही खालीं आणाव्यात आणि त्यांचा उपयोग राधिकेच्या पातळाचे किनारीसाठीं, पोलक्यावरच्या वेलबुट्टीसाठी, नाही तर कपाळावरच्या कुंकवासाठी केला, तर ती फारच सुरेख दिसेल, याचं चित्र त्याना दिसू लागायच. पण आज ते चित्र त्याच्या मनात भरेना. एवढंच नव्हे तर राधिकेबद्दल विचार करणहि बर नाही याची त्यांनीं आपल्या मनाशी समजूत घातली.

पण माणसानं कितीहि नाही म्हटल तरी कांही गोष्टीचे ठसे त्याच्या मनावर इतके पक्के उठलेले असतात की, त्याला देखील न कळतां त्यांचा वावर त्यांच्या मनांत सुरू असतो. आताहि तसंच झालं. राधिकेचा विचार ते मनांतून काढीत होते; पण तो दूर जात नव्हता. आजपर्यत मनाशी रंगविलेली चित्रं त्यांना स्वस्थ बसू देत नव्हती.

फारसं काम नसलं की, भल्या पहाटेच उठून व झेल्याला बरोबर घेऊन मास्तर फिरायला जात असत. इकडच्या तिकडच्या गप्पा मारतां मारतां रस्त्याच्या दुतर्फा असलेल्या दाट झाडीतून त्यांची पावल पडू लागली कीं,

मास्तरांच्या मनांत येई, ' ह्या निसर्गानं आयत्या तयार केलेल्या कमानी-खालून राधिकेचा हात आपल्या हातांत घेऊन खुशाल भटकत रहावं; चंद्रसूर्यांच्या आणि पानाफुलाच्या साक्षीनं एकमेकांचे हात एकमेकात कायमचे गुतवून टाकावेत.'

आणि एखादे वेळी रात्रीचे मास्तर आपल्या खोलीत बसले, तिथल्या खिडकीतून चांदणं आंत डोकावू लागलं म्हणजे त्यांना वाटू लागे, 'आभाळीचा चमचमणारा निळा छत पडद्यासाठी म्हणून आपल्या दरवाजा-वर लावावा, चंद्राचा दिवा उशाशी ठेवावा, कोकिळेचा साद घरांत घुमं द्यावा आणि आपण तो पडदा हळूच बाजूला सारीत अर्धवट डोकावून पहात राधिकेच आपली राणी म्हणून स्वागत कराव. '

कधी कधी ते झोपेंत असले म्हणजे एखाद्या निळसर दिसणाऱ्या डोंगरा-कडे राधिका धांवते आहे, हळूच मागें वळून हसते आहे, लाजत मुरकत ह्यातान काही खुणावते आहे आणि आपण तिच्या मागून पळतों आहोंत, पण ती सापडत मात्र नाही, असा देखावा मास्तरांना दिसला कीं, त्यांची छाती दडपून जाई. ते दचकून जागे होत आणि भीतीनं दडपलेल्या छाती-वरून हात फिरवीत हळूच डोळे उघडले म्हणजे मग ते स्वतःशीच म्हणत, ' अरे, स्वप्न होत म्हणायच ! किती घाबरलो आपण उगाचच ! ! ' आणि मग तोंडानं शीळ घालीत ते हसतमुखान कामाला लागत.

पण राधिकेन त्यांच्या कवितेची चाल लावली नाही, कबूल केल्याप्रमाणं तिनं झेल्याला अगर किसनलाहि गाणी शिकवली नाहीत, तेव्हांपासून मात्र ते बरेच नाराज झाले होते. तिची आणि त्याची गाठ पडू शकत नव्हती, त्यामुळं तर त्यांना कांहीच सुचत नव्हतं. मनात उद्भवणारीं प्रश्नोत्तरें त्यामुळंच त्याना सतावून सोडीत होती.

शाळेचा बक्षिससमारंभ चांगला झाला. दिपोटीसाहेब खूष झाले. मुख्याध्यापकानी विश्वासराव मास्तरांच आणि त्यांच्या वर्गाच भरपूर कौतुक केल; पण मास्तराना कशातच म्हणावा तसा आनंद वाटला नाहीं. आपल्या लेखनाच, आपल्या कामगिरीच राधिकेनं कौतुक कराव ही त्यांच्या मनाला लागलेली ओढ अजूनहि तशीच राहिली होती. कांही तरी आपल्या मनाला बोचत आहे हें ते नाकबूल करूं शकत नव्हते.

आणि तेवढ्यासाठीं हें गांव सोडून आपल्या गांवीं जावं, आपल्या घरीं रहावं आणि तिथून शाळेला यावं असा निश्चय त्यांनी आपल्या मनाशीं केला होता. हातान करून खाण्यापेक्षा लहानपणापासून आपल्यावर जीव टाकणाऱ्या एका म्हाताऱ्या शेजारणीच्या हातची भाकरी खाऊन तिच्या आपुलकीच्या शब्दांनी मन शांत करावंस त्याना एकसारख वाटत होतं.

'इथून जावं हें चांगलं ! इथ तरी आपलं कोण आहे ?' मास्तरांनीं स्वत:लाच प्रश्न केला. त्या वेळी शकुंतलेन त्यांना लिहिलेली चिठ्ठी त्याच्या नजरेसमोर आली. आपल्या मैत्रिणीशीं विवाहबद्ध होण्याविषयी तिनं केलेली सूचना त्यांना अमान्य होती अशांतली गोष्ट नसली, तरी ती अशक्य कोटींतील वाटल्यानं तिला मुद्दामच उत्तर न धाडतां ते स्वस्थ राहिले होते. एवढंच नव्हे तर राधिकेच्या आजोबांचा तिखट स्वभाव लक्षांत घेतां उत्तर न देण्यांतच शहाणपणा असल्याची त्याना खात्री पटली होती. त्यासाठींच राधिकेला विसरण्याचा त्यांचा प्रयत्न चालला होता. पण यश येत नव्हतं. उलट या घटकेला ती कुठ भेटेल, कुठं दिसेल, तर तिच्याशी कांही बोलावं, नाही तर तिच्या नुसत्या दर्शनानहि मनाला शांति मिळवावी या भावनेनं ते चांदण्या रात्री घराबाहेर पडले. उगाचच त्याचं मन हुरहुरूं लागलं. कारण नसतांना 'ही आजारी तर नसेल ना !' अशी शका त्याच्या मनाला चाटून गेली आणि त्यामुळंच झेल्याच्या घराकडे त्यांचीं पावलं वळलीं.

आणि त्याच वेळीं कण्हत पडलेल्या राधिकेच्या उशाशी येऊन श्रीपती म्हणाला, "पानी पाइजे का ग ? कमी झाला का ताप बाईच ?"

शकुंतला राधिकेशेजारीं बसलीच होती. तिनं तिच्या कपाळावर मिठाच्या पाण्याची पट्टी ठेवली आणि श्रीपतीला सांगितलं, "मी बघते सगळं. तुम्ही जेऊन घ्या."

"पोरगीनं घोटभर पानी तरी घेतल्याबिगर मला काय सुचायचं न्हाई!"

"ताप उतरला म्हणजे घेईल ना !"

"कवा उतरायचा आतां ह्यो ताप ? चार रोज झालं असत्याल आज ताप भरून !"

श्रीपती काळवंडून गेला होता. आपल्या वडिलांनीं लेकीला मारलं आणि म्हणूनच ती आजारी पडली या समजुतीनं त्याचं मन त्याला खाऊन घेत

होतं. पण वडिलाच्या पुढं अवाक्षरहि काढायची त्याची छाती नव्हती. तरी पण तो शकुतलेजवळ अगदी हलक्या आवाजात म्हणाला, " माज्या जागीं दुसरा कोन असता तर त्येन–त्येन बाचं बी थोबाड रगविल असत ! " इतक्यात तिथं येणाऱ्या आजोबांनी ते ऐकल. ते हळूच पुढ झाले आणि राधिकेच्या अगाला त्यानी हात लावला. विस्तव डसावा तसा चटका बसल्याबरोबर त्यांच मन चरकल. त्यांना बघून घाबरलेल्या श्रीपतीकडे आणि शकुंतलेकडे त्यानी आळीपाळीन पाहिलं. राधिकेच्या कानाशी वाकून त्यांनी विचारल, " लई दुकतया माज्या बाळीच ? " पण त्यांना उत्तर देण्याच्या भानगडीत न पडता डोळे मिटून राधिकेन तोड बाजूला केल आजोबांना कसंसच वाटल. केविलवाण्या नजरेनं श्रीपतीकडे आणि राधिकेकडे पहात त्यांनीं एखाद्या अपराधी माणसाप्रमाण खाली मान घातली.

श्रीपती गुपचूपच खाली निघून गेला. शकुतलेन तिथून उठून खिडकीतून तोड बाहेर काढल त्यामुळं तर आजोबाच्या मनाला आणखी एकदां धक्का बसला.त्याचे डोळे भरून आले. सद्गतित कठान तापान फणफणलेल्या राधिकेला पोटाशी आवळून धरीत कापर भराव त्याप्रमाण बाहेर पडणाऱ्या कातर आवाजांत त्यानी म्हटल, " चुकी झाली माजी पोरी ! तू मास्तरावर बोलली न्हाईस म्हन ह्या शकनीन सागितल माज डोळ खाड्दिशी उगाडलं म्हनीनास; पर आता त्येचा काय उपेग ? कुनाच तरी काय तरी ऐकून म्या थोबाड रगविल तुजं ! माज्या हातावर इस्तू पडू दे. "

पण राधिकेनं हू की चू सुद्धा केलं नाही.ती गप्प पडली होती.तिच्या भावनांची पार राखरागोळी झाली आहे अशाच भावनेन ती तापाचीहि फिकीर न बाळगतां जगत होती. शकुतलेवर मात्र आजोबाच्या बोलण्याचा परिणाम झाला. झटकन् मागे वळून खिडकीशी टेकून उभ रहात तिन आजोबांना धीटपणान विचारलं, " बाबा, आपण पण एक वेळ आमच्या वयाचीच मुलं होतो याचा विसर पडतो का हो मोठ्या माणसाना ? मरणप्राय दुःख होईल एवढं टाकून बोलताना त्यांना आपल्या तरुणपणची कसलीच याद येत नसते ? पोर चुकतात, तसंच कधीं कधीं आपणहि चुकतों असं मनांतसुद्धा नाही येत त्यांच्या.."

# : १२ :

" अथांग समुद्राला आलिंगन देण्यासाठी आपले दोन्ही बाहू पसरणारा कारवारचा अर्धचंद्राकृति किनारा पाहिला म्हणजे अनंताला भेटण्यासाठी हुरहुरणारी इच्छा साकार झाल्यासारखी वाटते. ह्या किनाऱ्यावर उभें राहिले म्हणजे मग मनाला पटतें की, निसर्गाचें सौंदर्य हें काही मनाचें मृगजळ नाही तो अनंताच्या आनंदाचा प्रकाश आहे. त्या प्रकाशाने आपण ओढले जातों, आणि त्यामध्ये आपण विलीन होऊन जातों.

"विश्वास, गोव्याची सफर करून मित्राच्या आग्रहासाठी म्हणून मी कारवारला आलो आणि खर सांगायच म्हणजे तिथ आल्यानंतर मी हे तुला वर लिहिलय् ते गुरुदेव टागोरांच म्हणणं मला अक्षरश: पटल. वाटल, आपण इथच या किनाऱ्यावर बसून तासन् तास रहाव. उभा जन्म इथच या सौंदर्याची छाननी करीत घालवावा !

"अरे, दिवसा-रात्री, वेळी-अवेळी, वाटेल तेव्हा मी इथ भटकलों पण काही मन तृप्त झाल अस वाटेनाच. रात्रीच्या वेळी वेड्यासारखा मी या किनाऱ्याच्या वाळवटात बसायचा. लाटांच तांडव नृत्य चालल्याचा आवाज कानावर आदळत होता. समोर अफाट दर्या पसरल्याच माहीत असूनहि मला त्याच भान उरल नव्हत. मी माझ्याच तंद्रीत होतों. घटकेघटकेनं आपल अस्तित्व दर्शविणाऱ्या दीपगृहान माझ भान हरवल होत.

"विसू, त्या दीपगृहावर चोहोंकडे आपल तोंड वळवीत स्वत:भोवती पहारा करणाऱ्या दिव्याचा झोत एकदम लखकन वीज चमकावी तसा अंगावर यायचा आणि नाहीसा व्हायचा. भारी भुरळ पडायची मनाला. सगळ अंग वाळूत खुपसून घेऊन तेवढ डोकच वर काढाव म्हणजे गार वारा झोबल्यानं घरी जायचा मोह टळून याच झोताला डोळ्यांत सांठवून घ्यावं असं वाटू लागे.

"पण मग लगेच लक्षांत येई की, रात्री तीनचार तास तरी शांत झोप काढल्याशिवाय याहिपेक्षा मनाला वेड करणार दृश्य आपल्याला पहायला मिळायचं नाहीं ! आणि मग सतरादां मागं बघत बघत मी घरीं जायचा.

आणि उजाडत पुन्हा किनाऱ्यावर यायचा. डाव्या बाजूचं बंदर, उजव्या बाजूची सुरूच्या झाडासारखी उच नि रेखीव झाडं, समोरचा दर्या आणि मी हे एकमेकात केव्हा मिसळून जात कळायचं नाहीं. अरे, रंगीबेरगी शख गोळा करावेत, तुझ्या शाळेंतील मुलांसाठी म्हणून त्यांच्या शोधाला मी लागलों की, नेमक तेवढं विसरून डोळे तारवटून बघायचा ! पायाखाली कलावंतान विणलेल्या गालिच्यापेक्षांहि सुदर चित्राकृतीनी नटलेले अनेक गालिचे वाळूवर उमटलेले दिसायचे ! वाटायचं, चित्रं काढून तुला दाखवायला आणावीत. पण मग मी म्हणे, तूच एकदां येईनास हे सार बघून ? तुझा एकाकी जीव अगदी शांत होईल या वातावरणात ! केव्हा येशील मग?"

मुलाना वर्गात निबध लिहायला सांगून फार दिवसांनी आलेलं मित्राच हे पत्र मास्तरानी एकदां सोडून दोनदां वाचल आणि ते हसत हंसत पुटपुटले, 'पण मी आता एकटा कुठं राहिलोय् ? माझ्या जिवांत दुसराहि एक जीव एकजीव होत चालला आहे हें याला कस कळावं ? . .'

" झेल्या, आण बघू काय लिहिल आहेस ?" मास्तरांनी वर्गाकडे नजर टाकीत झेल्याला बोलावल. पण वर्गातील एक मुलगा उठून म्हणाला, " आज तो आला नाही. "

" खरच ? " कधीहि गैरहजर न रहाणारा झेल्या आला नाही हें ऐकून त्याना आश्चर्य वाटल, तेव्हां तोच मुलगा पुन्हा म्हणाला, " किसन पण आला नाही आज ! "

" अस ? का बर ? "

" किसनची आक्का आजारी आहे ! " त्या मुलानं त्याला कळलेली बातमी दिली

" किसनची आक्का आजारी आहे ?" मास्तरांच्या कपाळावर आठयांचं जाळं पसरल. त्यांचा विश्वास बसेना त्या बातमीवर, म्हणून त्यांनी त्या मुलाला पुन्हा विचारलं, " तुला कोणीं सांगितलं ? "

" शाळेला येतांनाच कळलं तसं आम्हाला. "

" अरे, पण सागितलं कोणी ? "

" त्याच्या आळीतली पोरं म्हणालीं की, तो आज शाळेंत येणार नाहीं.

कां म्हणून विचारलं तर त्या पोरांनी त्याच्या आईकडे जाऊन विचारलं तेव्हां हें कळलं, असं ती म्हणालीं ! '

" हं हं ! काय होतंय् किसनच्या आक्काला ? "

"तें नाही माहीत !" त्या मुलानं आपणाला तें ठाऊक नसल्याचा खुलासा केला आणि तो खाली मान घालून उरलेला निबंध वहीवर लिहूं लागला.

पण मास्तरांचं लक्ष मात्र वर्गांतून उडालं. निबंधाचा तास संपल्याची घटा झाली आणि पोरानी टेबलावर वह्या आणून ठेवल्या तरी ते आपल्याच तद्रीत होते.

शेवटी शाळा सुटायच्या वेळी हेड्मास्तरांनीं वर्गात येऊन मुलांच्या अभ्यासाची चौकशी केली, तेव्हां कुठें झोपेतून जाग यावी तसे मास्तर म्हणाले, " आतांपर्यंत सात आठ निबध झालेत लिहून " आणि मग त्यांनीं हेडमास्तरांना हवी ती सर्व माहिती सांगून टाकली. तथापि त्यांचं लक्ष दुसरीकडे कुठ तरी वेधल असल्याचं हेड्मास्तराच्या नजरेतून सुटल नाही. त्यानी वर्गाबाहेर पडताना शेवटी मास्तरांना विचारल सुद्धा, " आज तुम्हांला बरं नाहीं का ? "

त्यावर मास्तरांनी नुसती मान हलवून वेळ मारून नेली खरी; पण मग शाळेच्या आवारांतून बाहेर पडतांना त्यांना जाणीव झाल्याशिवाय राहिली नाही की, आपण आज हेड्मास्तरांच्या जवळ खोटं बोललों. क्षणभर त्याचा त्यांनाच या बोलण्याचा राग आला. खोटं बोललेलं आपणाला खपत नसताना आपण तसं बोललों ही गोष्ट त्याच्या मनाला खटकली. पण तसं करण्याशिवाय गत्यंतर नव्हत हेंहि लगेच त्यांच्या ध्यानात आल. खर सागायचं म्हणजे हेड्मास्तरांची आपल्यावरची मर्जी उतरण्याची शक्यता निर्माण होणार होती ! आणि मास्तरांना नेमकं तेंच नको होत; म्हणून त्यांनीं आपल्या मनाची समजूत घातली, ' प्रत्येक वेळी प्रत्येकाशीच खोट बोलणं हें स्वतःला फसवणारं असलं तरी मनाचा तोल सावरणारंहि ठरतं केव्हां कव्हां ! तेव्हां तो कांहीं गुन्हा होऊं शकत नाही. नाहीं तरी राधिका आपणाला आवडत असूनहि आपण त्या गांवचे नसल्याचं नाटक आपण अनेकदा कां केलं असतं ?'

मास्तरांचं स्वगत भाषण संपल आणि शेवंती आक्कांचं सुरू झालं--

' उबा जलम ह्या घरांत राबूनबी शेवटी माज्याच डोस्क्यावर खापार फोडाय कमी करायची न्हाईती ही मानसं ! न्हानपनापसन आईच सुक ठावं न्हाई. कधी तिच्या हाताचं तेलपानी केसाला का अंगाला मिळालं न्हाई; म्हन बान कशात कमी पडू दिल न्हाई ही गोष्ट खरी. पर आई ती आईच आन् बा त्यो बाच ! आज जर माजी आई जित्ती असती तर मला हृये दिवस का बगायची येळ आली असती ?

' माज लगीन झालं तवा आई असती मजी तिनं न्हाई व्हय काय म्हटलं असतं. माज्या हातात भरलेल्या हिरव्या चुडयावर तिची नजर फिरली असती मजी त्यो येससरी झाला असता ! पर देवाच्या मनांत नव्हत तिला सुक दावायच ! आन् माज्या नशिबांत नव्हत तिच सुक भोगायच.

' आज आमच्या शिरपूचंच का हुईना घटकाभर ! आपल्या पोरीसाठीं त्येचा आन् त्येच्या बायकूचा जीव वडतूयाच का न्हाई ? किती केली तर मी आत्ती पडली. वाईच का हुईना, माजा डोळा लगतूया राच्या. पर ती दोग उलती पालती हुत्याती त्या पोरीकडं बगून ! पोटजाळ म्हनत्याती त्यो ह्येलाच.

' त्येच माज्या म्हाताऱ्याला माज्यासाटी जे वाटल ते ह्या कुनास्नीच वाटायच न्हाई. त्येच आतडं माज्यासाटीच खालीवर हुईल. माज्या बोटाला आल्याली कळ त्येला कळल तेवडी कुनालाच कळायची न्हाई !

' पर माजा जलम असला काय आन् नसला काय सारकाच ! सगळ्यास्नी फुलावानी झेलल तर मी पाइजे, न्हाई तर पाण्यात बघत्याती एकेक !

' ह्या पोरगीचं कल्यान व्हावं, कुनी तिला नाव ठेवू नी म्हन त्या मास्तरावर बोलत जाऊ नग म्हटल तर खायाला उटली कारटी ! माज्या बाच काय जातया त्येच्याबर लगीन लावून गेली म्हन तरी ? ज्येचं ते भोगील भोगायचं असलं नशिबांत तेवडं. त्यें काय कुनाचं चुकत न्हाई. आज्जानं तोंडांत मारली ती काय आन् त्येच्याबद्दल ताप भरला त्यो काय ! मारत न्हाई व्हय जगांत कोन नातवंडाला तवा ह्येनंच मारलं ? '

शेवंती आक्का या अंगावरच्या त्या अंगावर झाल्या आणि त्यांनी पदरानं आपल तोंड झाकून घेतलं. त्या वेळी मघाशीं त्याच्याशी बोलत बसलेली कमळाबाई त्यांच्यापुढं चहाचा कप ठेवीत म्हणाली, " हे घर तुमचं तसंच तिचबी ! ती बी हितं म्हायारवासीनच हाय तुमावानी. मामाजीची समजूत तुमी घालायची का भांडान पेटवायचच वो लई ? पोटच्या पोरावानीबी हाय म्हनतायसा न्हवं पोरगी तुमाला ? " आणि ती फणकाऱ्यानं निघून गेली

शेवंती आक्का उठून बसल्या. त्यांच्या जिवाची काहिली झाली. रागारागान पुढ्यांतला कप लाथेनं ढकलून देत त्या कमळाबाईवर ओरडल्या, " तुज्या जिबीला हाड हाय का न्हाई कैदास्नी ? तुजी पोरगी काय मरावी अशी वाटतीया व्हय मला ? " त्याच्या मनाचा तोल सुटला. कमळाबाईचं काळीज चरकल. लेकीच्या मरणाचा उच्चार नणदेच्या तोंडून होताच मग तिनहि तोंड सोडलं, " असा कावळ्यान सराप दिला म्हन ढाळी मोडत नसती ! मरतीया कशापाय पोरगी ? तुमच्या उराव नाचवीना तर कशाला पाइजे ? "

शेवंती आक्कांच्या अगाचा भडका उडाला. आदळ आपट करीत त्यांनीं वडिलाच्या जवळ भावजईविरुद्ध चुगली केली. त्यामुळं आजोबाहि पुन्हा भडकले. तावातावानं सुनेपुढ येत त्यानी तिला दम भरला, " आत्ताच्या आत्ता चालती व्हो घरातन ! असली अवदसा घरांत नग माज्या. "

माडीवर झोपलेल्या राधिकेनं ते ऐकल. तिच्या मनाला धक्का बसला. उठवत नव्हत तरी कोलमडत का होईना खिडकीशी येत तिनं बोलतां येईल तेवढ्या मोठ्यान आपल्या आजोबाना सांगितलं, " माझ्यामुळं तुमचीं सगळ्यांची माथी फिरलीत ! मीच तुमच्या पुढं काळ करते म्हणजे मग सगळी थडगार बसाल ! मला माडीवरन एवढी खाली न्या म्हणजे मग पुढ कस जायचं ते मी पाहीन. "



# : १३ :

" शके, ती बघ गंमत, पाहिलीस ? पळ पळ लौकर. "

राधिकेन अगदीं घाईघाईनं बोलावलं म्हणून चुलीपुढची खरकटी गोळा करता करतां शकुंतला परसदारी आली. ती जवळ येऊन ठेपतांच राधिकेनं लांबवर बोट करून तिला एक गमत दाखवली. डाव्या बाजूच्या रस्त्यावर लहान लहान असे अनेक दिवे हलत होते आणि पुढं पुढं सरकत होते.

" काय ग ते ? "

" हात वेडे ! एवढं माहीत नाहीं का ? अग, मेंढरं येताहेत आणि त्यांच्या डोळ्यांचा उजेड दिसतोय तो ! पाहिला नव्हतास कधी ? "

" नाही बाई ! "

" तर मग आतां नीट बघून ठेव. "

" तूच ठेव बघून तुझ्या लग्नांत असल्या चमचमत्या गोळ्यांची मुडा-वळ करायला मग बरं पडेल ! " राधिका मनापासून हसली आणि तिनं शकुंतलेचा गालगुच्चा घेतला. मुडावळीचं नांव निघताच शकुतला लाजली.
" इश्य ! कांही तरीच बाई तुझं ! "

" कां ? चारपांच दिवसावर तुझ लग्न आलं आणि तरीसुद्धां काही तरीच ? "

" इश्य ! अशी चिडवशील तर बघ हं ! "

" चिडवणार खूप ! नाही कसं ? लौकर बरी झालें म्हणून बरं, नाहीं तर परभारेच लग्न उरकून सासरी पळाली पण असतीस केव्हांच ! "

" तुला सोडून ? खरं वाटतं तुला ? तू बरीक करशील तसं लग्न. मी नाही. "

" तें बघूं. आतां आधीं तुझ्या लग्नाची घाई चाललीय् ना ? तुझे हे काय शिकलेत ग ? "

" मला नाही माहीत जा ! "

" पुरे पुरे हं ! इतकी लाजतेस तूं मला लाजाळूचं झाड म्हणून ! "

" हे कां ग विचारतेस नाहीं तर तू ? "

" सांग ना. ओळखपाळख चांगली असावी मैत्रिणीच्या नवऱ्याची; म्हणजे हक्कानं केव्हांहि येतां येतं ! "

" त्याची नको तुला काळजी. "

" अग हो; पण सांग ना त्यांचं सगळं सगळं ? " राधिकेनं दोन्ही हात धरून शकुतलेला गळ घातली तेव्हां आपल्या आईपासून अगदी बाजूला तिला नेत शकुतला म्हणाली, " तसे ते फार शिकले नाहीत; माझ्या एवढेच शिकलेत. पण स्वभावानं फार चांगले आहेत म्हणे. मोठं घर आहे. खूपशी जमीन आहे. दोघे भाऊ, तीन बहिणी आणि आई आहे त्यांना. स्वतः शेती करीत असले तरी वाचायचा नाद आहे म्हणे ! शिवाय--"

" बोल, बोल; थाबलीस का ? "

" चिडवणार नसलीस तर सागते. "

" साग साग ! "

" नाही चिडवायची म्हण, त्याशिवाय नाहीं. "

" बरं बाई, नाही चिडवत ! "

" शिवाय दिसायलाहि चांगले आहेत ते. "

" अय्या ! "

राधिकेनं शकुंतलेच्या लाजण्याचा अदाज घ्यावा म्हणून तिनं तोंडावर ओढलेला पदर बाजूला केला तों तिच्या गालावर चांगलीच लाली आली होती.

" लग्नाच्या आधीं इतकी लाजतेस नि मग तर विचारायला नको ! "

" जाऊं दे बाई. तू लग्नाला येणार कीं नाहीं तें सांग आधी. "

शकुंतलेनं मोठ्या उत्सुकतेनं राधिकेकडे पाहिलं. पण राधिका त्यावर कांहीं बोलली नाहीं. तिनं नुसती मान हलवली आणि मग क्षणभरानं म्हटलं, " तुला भेट म्हणून मीं काय दिलेलं आवडेल ? "

तूं स्वतः असलीस कीं कांहीं नको. "

नुसतं बोलायला ! भाऊजी एकदां भेटले कीं, माझी आठवण ठेव-म्हणजे मिळवली ! "

" किती फाजिल आहेस ग राधे ? " शकुंतलेनं राधिकेच्या पाठींत रपाटा घातला आणि ती तिथून आंत पळाली. त्यामुळं तिच्या मागोमाग जात राधिकेन तिला विचारल,

" शके, आतां तू जायचीस म्हणजे माझ ग कसं होणार? मला कोण? "

" जायची म्हणजे कायमची जातेय् की काय ? "

" नसलीस तरी तुझ माहेरी रहाणं पाहुणीसारखंच व्हायच आतां. "

" कांही अशी खर आहे ते. पण आलें की आधी तुला भेटेन. "

" खर ? "

" अगदी खरं ! "

" पण तू येस्तोंवर काय करूं मी ? "

" मग तू येशील माझ्या बरोबर ? " शकुतलेनं राधिकेच्या डोळचात पाहिलं. दोघीहि एकमेकीकडे टक लावून बघू लागल्या. दोघीना पण आपण आतां दूर रहाणार ही कल्पना सहन होईना

" वेडी तर नाहीस शके ? तुझ्या सासरी मला ग कोण येऊन देईल ? आणि मी तरी तिथ कशाला येऊ ?"

" तुझ्या लग्नाचं काय ठरवलस तू ? "

" तूर्त काही नाही. घरांत कोणी कांही बोलत नाही आणि मलाहि तूर्त शांतताच हवीय्. वाटेल त्याच्याशीं ते म्हणतील म्हणून मी लग्न करणार नाही ! " राधिका आपल्या लग्नाचा विषय निघतांच गंभीर झाली, म्हणून शकुतलेनं विषय बदलीत म्हटल, " तू मला पत्र लिहिशील ना ? "

" जरूर ! शंका का आली ? "

" आणखी अगदी मोकळचा मनानं सगळं कळवशील ? "

" सगळं म्हणजे ?

" मनाला वाटेल तें ! "

" तें बघीन. इच्छा असूनहि सगळचा कल्पनांना वाचा फुटत नसते कधींच ! इतर कुणाचं नसलं तरी आपलं आपल्यालाच बंधन असतं कां बाबतींत. त्या बंधनापलीकडच सगळं लिहीन. "

" बरं बाई, तुझी मर्जी ! मात्र एका गोष्टीचं वचन दे ! "

" कोणत्या ग ? "

"की काय वाटेल तें झालं तरी मी रडणार नाहीं, हातपाय गाळून बसणार नाही आणि उलट बोलून घरच्या माणसांचा राग जास्त उलटून घेणार नाही. आहे कबूल ?"

" होय, इतक्या दिवस सावलीसारखी तू बरोबर होतीस. आता मी एकटी रहाणार. "

" राधे, माणूस तस म्हटल तर एकटं असत का कधी ? शरीरानं मी जवळ नसले तरी मनान असेनच की ! "

" खर आहे ! चुकले मी. माझी काळजी करू नकोस. तू मजेत रहा तिथ. "

" तिथल सगळ कस आहे देव जाणे बाई. मला तर भीति वाटते' जमेल का ग सगळ ? "

" न जमायला काय झाल ? पाण्यात पडल की पोहण जमत याचा अनुभव नाही का आपल्याला आला ? "

" ये, खरच ! आता बाकी माझा सारा खटचाळपणा मला गुडाळून ठेवायला पाहिजे, नाही ग ? "

"एवढं कळल तरी मी म्हणते पुष्कळ झाल तुझ्या बाबतीत ! "

" म्हणजे मी–"

" छे, छे ! तशी तू शहाणी ग ! पण आपलं सांगितल. काय ग, नांव-बिव कशी घेणार साग तरी ? "

नावाचा प्रश्न निघताच पुन्हा शकुतला लाजली आणि पायाच्या अगठ्यान जमिनीवर उकरल्यासारख करीत तिन खाली मान घातली. इतक्यांत तिची आई त्या दोघीच्याजवळ येऊन म्हणाली, " चार दिवस हाईत तोंवर भेटून घ्या पोटभर एकमेकीस्नी ! पुढच कुनी बगितलंया ? [illegible]कनीवर आतां काय आपला हाक न्हायाचा हाय ? आतां ती अक्षता [illegible]ल्या कीं धर्मांची झाली. गेली मजी सारं घर खायाला उटल, म्हन काय [illegible]न भा्गतंया व्हय पोरीच्या जिनसाच ? आज न्हाई उद्यां ती [illegible]त्यच्याकड जायचीच कीं ! "

आणि त्याच वेळीं तोच प्रश्न नेमका शेवंतीआक्कांनीहि आजोबांच्या-जवळ काढला. पोरीची जात जेवढ्या लोकर सासरी जाईल तेवढी चांगली असंच त्यांचंहि म्हणण होत. म्हणून त्यांनीं आजोबांच्याजवळ एका स्थळाचा उल्लेख केला, " सांगलीच्या पाटलाचं प्वार कसं काय हाय?"

त्या वेळी श्रीपतीहि जवळ होता. त्याला हें स्थळ पसंत नव्हतं. म्हणून तो चटकन् बोलून गेला, " पर पोरगं शिकलंया कुठं त्यें ? आपल्या पोरीला सोबल असं तरी नको ? नुसत्या इस्टेटीला काय चाटायची हाय ? "

" मजी ? माज्यापरास तुलाच लई कळतंया म्हण की ! " आजोबांना श्रीपतीच म्हणणं मुळीच पटलं नाही. ते उलट त्याच्यावर संपापले. त्याचं म्हणणं होत की, आपण जिवंत आहों तोवर घरच्या कारभारांत श्रीपतीनं लक्ष घालू नये हें चागलं आणि इतर बाबतीत खरोखरच श्रीपति तसा वागतहि होता. पण स्वत.च्या मुलीच्या जन्माचा प्रश्न होता हा, म्हणून कधी नव्हे तो त्यानं तोंड घातलं, तर वडील त्याच्यावरच भडकले ! त्यामुळं मग तोहि थोडा धीट होऊन म्हणाला, " तुमच्या इतकं कळत नसल तरी पोरीचा बा म्हन एवडंच वाटत की, नुसता शिरीमत जागा बगून आक्कासारकच हिचंबी हू नी ! "

" आर व्हय व्हय ! कळना मला तवा ह्यो शिकवाय आला. पोरगी तुजी आन् माजी कोनच न्हवं म्हन की ! "

" तुमची नात हाय की ! कोन न्हाई कशी ?"

" मग तिचं सुकदुक मला कळतंया. तू जा आपला शेताव बग जा काम."

" पावसांत काय चिकूल उचलू काय तिथं जाऊन ? " श्रीपतीला राग आला. आपल्या मुलीच्या लग्नाच्या बाबतींत वडील लक्ष घालू देत नाहीत ही गोष्ट त्याला आवडली नाही आणि त्यानं उलट उत्तरं केली म्हणून आजोबा संतापले, " पोरीचा बा झालास म्हन काय सगळी काळजी तुलाच हाय म्हनायची ? आमी तिचं वाटूळच कराय बसलूया म्हनायचं मग ?"

त्यावर श्रीपती कांही बोलला नाही. तो मुकाट्यानं उठून गेला. सैंपाकघरांत जाऊन त्यानं कमळाबाईला विचारलं, " पोरगी कुठं गेली

" शकीच्या घरला. लगीन ठरलंया तिचं, तवा जाऊन येतें म्हन

म्यांच म्हटलं, रहा एक दिवस तिच्याजवळ." कमळाबाईनं पाण्याचा तांब्या नवऱ्यापुढं सरकावला.

"शकीला कुटं दिली ?"

"तासगांवला. पर न्हवरा असतो सांगलीला आज्जीपशी म्हन बोलवा हाय."

"काय करतो त्यो ?"

"सातवी पास झालाय म्हनत्याती. पर शेतकीतच हाय म्हन !"

"अस्सं ? आनीक घरदार, शेतवाडी हाय का न्हाई ?"

"मस्त हाय म्हन !"

"मग तुज्या लेकीला कसली जागा बगतीस आता ?"

"कोन, मी ? तुमी एवड बापय हाईसा तर तुमचं काय चालना आन् मला वो कोन इच्यारतया ? खुळ तर न्हवसा ?"

"माजी पोरगी लई शिकल्याला पोरालाच द्याची एकांदा नोकरदार बगून !" श्रीपतीन पाण्याचा घोट घेऊन तांब्या खाली ठेवला. कमळाबाई त्याच्याकडे बघतच राहिली. तो काय म्हणतोय् ते कळत असूनहि उमज न पडल्यासारखच तोंड तिनं केलं. त्यामुळ श्रीपतीच पुन्हा म्हणाला, "सागलीची जागा काडलीया त्या दोघांनी; पर पोरगं अडाणी हाय, त्येची काय वाट ? नांगर गट्टचालाच द्याची तर शिकिवली कशाला मग ? शकनीचा न्हवरा शेतकीत असला तरी लई शानासुर्ता हाय. तरणाबांड पोरगा, दिष्ट लागील असा हाय अक्षी."

"तुमी बगीतलासा ?"

"व्हय."

"नशीब उगाडलं म्हनायचं पोरीचं मग ! बर झालं, कुणाचंबी चांगलंच असावं."

कमळाबाईच्या या बोलण्यावर घराबाहेर जावं म्हणून डोक्याला पागोटं बांधीत श्रीपति एवढंच म्हणाला, "आपल्या घरांत सारं डोंगराएवडं नाचतंया आन् लोकांच्या सुकाला करतीस काय घेऊन ? आपलं भलं तर लोकांचं भलं ! पोरीच्या कपाळीं देवानं कसली रेग वडलीया कुनाला ठकल हाय ?"

## : १४ :

" धडाल् धुप् ! "

देव्हाऱ्यावरील देवांच्या अगावर काही तरी आदळलं. देवांची खुळखुळ झाली. कुणाचा तरी जोरानं चाललेला श्वासोच्छ्‌वास ऐक् येऊं लागला. कसली तरी चोरटी हालचाल माळीत सुरू झाली.

" कोन हाय ? " या अगावरून त्या अगावर वळत शेवंती आक्कांनीं मानेखालचा हात काढून घेत चौकशी केली पण उत्तर आलं नाही हाल-चाल मात्र चालू राहिली. त्यामुळ त्यांना वाटल माजर आहे आणि म्हणून त्यांनी ' आर हुसूकको ऽऽ ' करीत मांजराला हाकलल पण पुन्हा कसली तरी चाहुल लागलीच म्हणून उशाशेजारची काडयाची पेटी घेऊन त्यांनीं दिवा लावला.

" चो ऽ र ! अर देवा ! दादा ऽऽ वैनी ऽऽ ! " देव्हाऱ्याजवळच फडताळ फोडून काढीत कुणीतरी माणूस उभा होता, ते बघून शेवती आक्काच धाबं दणाणल. त्यानी किचाळून घरच्या माणसाना हांक दिली आणि आतां त्या बोंब ठोकणार इतक्यात त्या माणसान त्याच्या तोंडावर हाताचा पंजा ठेवून जोरान दावला.

" शेवती ऽऽऽ " शेवंती आक्कांची किकाळी ऐकून दचकून जागे झालेले आजोबा माळीकडे धावले. पण आंतून आडणा घातलेला होता. त्यानी दारावर लाथ मारून पुन्हा हांक दिली, "शेवती ऽ दार उघड पोरी ! "

पण आतून आवाज आला नाही. कुणाची तरी पावल मात्र आजोबांना ऐकू आली. त्यानी दाराला कान दिला. आात कांहीं तरी दगा फटका असल्याची त्याना शका आली.

" कोन हाय ? " आजोबांनी मोठ्यान चौकशी केली आतला माणूस क्षणभर दचकला. पण दुसऱ्याच क्षणाला शेवंती आक्काच्या तोंडांत बोळा कोंबून घामाघूम झालेल्या आपल्या कपाळावरचा घाम त्यान पुसला. उत्तर द्यायच्या ऐवजीं त्यान बेदरकारपणानं दरवाजाकडे पाहिल आणि फडता-ळाच्या दाराचं कुलुप एका हिसक्यासरशी तोडून दागिन्यांच्या डब्याला हात

घातला. इतक्यांत आजोबांनी जोरानं बाहेरच्या दारावर लाथ मारली आणि आपल्या मुलाला हाक मारून ते ओरडले, " शिरप्या, धाव ! "

" काय झालं दादा ? " वडिलाची तातडीची हांक ऐकून माडीवरच्या एका खोलीत झोपलेला श्रीपती धावत खाली आला. त्याच्या मागोमाग कमळाबाईहि आली.

" काय झाल म्हन काय इच्यारतूस ? उडी टाक माळीवरची झडप उगडून माळीत. शेवती गप झालीय् ! कोन तरी घरात शिरलय् !! "

वडिलाचे शब्द ऐकताच श्रीपतीनं धावत माडीवर जाऊन जिन्यासाठी म्हणून राखलेल्या जागेवरची लाकडी झडप काढून दणकन् आत उडी टाकली.

त्याच क्षणाला आतला दिवा फुकून त्या माणसानं लपतछपत दागिन्यांचा डबा खाकोटीला मारला आणि आता तो सळया फासटून आलेल्या खिडकीतून पळणार इतक्यांत श्रीपतीनं त्याच्या अगावर चवताळून झडप घेतली. त्या माणसाच्या हातातील निसटलेल्या डब्याचा आवाज झाला. आजोबाच काळीज खालीवर होऊ लागल. त्यांचा श्वासोच्छ्वास जोरानं सुरू झाला, डोळे तारवटून गेले; त्यांनी आणखी एकदा दारावर लाथ मारीत शेवतीआक्कांना हांक दिली.

आंत श्रीपतीची आणि त्या माणसाची झटापट चालली होती. श्वास घ्यायला देखील श्रीपतीला उसंत मिळेना, तो तो ओ कुठून देणार ? आणि तोंडांत बोळा कोंबल्यामुळं भीतीन बेशुद्ध झालेल्या शेवतीआक्काचा तरी आवाज आजोबाच्या कानावर कुठून जाणार ?

" गुमान् गप ऱ्हा, न्हाई तर गोळी घालीन ! " आंतून तो माणूस श्रीपतीवर गुरगुरला. त्याचा आवाज कानावर येतांक्षणीच आजोबाचे डोळे विस्फारले. हकनाक पोर चोराला बळी पडणार या धास्तीन दरवाजाबाहेरच्या उखळावर उभी केलेली पहार अंगांतील सारं बळ एकवटून त्यांनी जोरानं दारावर लाथ मारावी तशी मारली.

'कडाड् कट्' दाराची एक फळी मोडली. आडणा बाजूला झाला. आजोबांनीं आणखी एकदां जोरान पहारेचा प्रहार केला आणि ते चटकन् आंत घुसले.

दुखावलेल्या नागाप्रमाणं श्रीपती आणि तो माणूस एकमेकांवर तुटून पडत होते. तरी पण संधि साधून त्या माणसानं कोपऱ्यांतील एक मुसळ उचलून श्रीपतीच्या अंगावर भिरकावून दिल आणि त्याच क्षणाला त्याच्या मनगटाभोंवती आजोबांच्या कणखर हातांचा विळखा बसला.

" दिवा लाव शिरप्या ! " आजोबांनी दांतओठ खात करकचून त्या माणसाला कवळ्यांत पकडला. त्यानं निसटून जाण्यासाठी खूप धडपड केली. पण दिवा लावण्यांत स्वत: न गुंतून जातां श्रीपतीनं त्या माणसा-भोंवती आपल्याही हातांची गच्च मिठी बसवली आणि तो ओरडला, "दिवा आन ग लौकर. "

कमळाबाईनं दडपून गेलेल्या छातीवर दोन्ही हात गच्च आवळून धरले. तिची पुढ जायची छाती होईना. त्यामुळं श्रीपती पुन्हा ओरडला, " काडी तर वड की !"

कमळाबाई धीर धरून पुढं झाली. तिनं दिवा लावला आणि निश्चेष्ट पडलेल्या शेवतीआक्का समोर दिसतांच ती घाबरून किंचाळली, " दिवाण साऽऽबऽ"

" आक्का ! " श्रीपतीनं दचकून मान वळवली. शेवंती आक्कांच्या कपाळावर त्या माणसान फेकलेल्या मुसळाचा जोराचा दणका बसल्यामुळं तें रक्तबबाळ झाल होत आणि त्यांच्या तोंडांत मघा कोंबलेला बोळा अजूनहि तसाच होता ! श्रीपतीचे हात एकदम ढिले पडले. तो झटकन् बहिणीकडे धावला.

" कोन ? इटचा ? तू ? " दिव्याच्या उजेडांत जांवयाचं तोंड नजरेला पडतांच आजोबानी त्याच्या नरडीचा घोट घेण्यासाठी आपल्या दोन्ही हातांची मिठी पुढं केली. पण विठोबा ती मिठी गळ्यात पडण्याअगोदरच मोठ्या शिताफीनं तिथून निसटला. क्षणार्धांत त्याची हालचाल अंधारांत विलीन झाली.

" शिरप्या, इटचा निसटला !" एकवार लेकीकडे डोळे फाडफाडून पहात आजोबा लहान पोराच्या चपळाईनं विठोबाच्या मागोमाग धांवले. हातां-तील पहार गच्च आवळून धरीत त्यांनीं ओरडून हांक मारली, "इटचा ऽऽ थांब !"

" काय झालं बाबा ? " आजोबांच्या ओरडण्य:नं दचकून जागी झालेली राधिका माडीवरून धावत खाली आली. आजोबा पळत गेलेले बघून दरवाजाबाहेर येत तिनं मोठ्यान विचारलं, " काय झाल बाबा ? "

" माज्या घरांत चोरी करतूस व्हय लेका ऽ ऽऽ ?" राधिकेला उत्तर देण्याऐवजी पळतां येईल तितक्या वेगान आजोबा दांत ओठ खात आणखी पुढं धावले; पण दुसऱ्याच क्षणाला 'धाप ' असा आवाज राधिकेच्या कानांवर आला. आजोबांच्या धावत्या पावलाची हालचाल एकदम शात झाली. राधिकेच्या काळजांत धस्स झालं. " आजोबा ऽऽऽ " राधिका वाऱ्याच्या वेगानं पुढ धावली. इतक्यांत ठेचकळून खाली पडलेल्या आजोबाना सावरीत धांवत येणाऱ्या राधिकेला मास्तर म्हणाले, " पाणी आणा लौकर ! "

" मास्तर ! " मास्तराचा अनपेक्षित आवाज अचानक ऐकायला मिळाल्यान राधिका धांवता धावतां एकदम थबकली.

" पाणी आणा चटकन् ! " बेशुद्ध झालेल्या आजोबाना माडीवर घेत मास्तरांनीं राधिकेला पुन्हा आवर्जून सांगितल.

" काय झालं ? " राधिका चटकन् पुढ झाली. अंधेऱ्या रात्रीतहि मास्तरांच्या मांडीवर पडलेल्या आजोबांची ओळख पटल्यामुळं ती घाबरून किंचाळली, " अगबाई ऽऽ ऽ मास्त ऽ ऽऽ र !"

" छे छे ! घाबरूं नका. थोडं पाणी आणा म्हणजे आतां सावध होतील; उठा ! "

" आत्तां आलें !" मास्तरांच्या सांगण्यामुळं धीर धरून राधिका घराकडे पळत निघाली आणि त्याच क्षणाला श्रीपतीहि, वडील अजून का घरांत परतले नाहीत याची चौकशी करावी म्हणून रस्त्यानं पळत निघाला. राधिकेची आणि त्याची अंधारांत थोडी धडक झाली.

" पोरी, तू ? " राधिकेला बघून श्रीपतीला कमालीचं आश्चर्य वाटलं. तो तिच्याकडे भांबावून बघू लागला.

" बाबांना लागलंय् !" राधिकेनं श्रीपतीला माहिती दिली आणि पाणी आणावं म्हणून ती पुन्हा धांवत घराकडं निघाली.

" दादांना लागलं ? " श्रीपतीच्या डोळ्यापुढं काजवे नाचूं लागले.

५

विठोबान दगडफेक करून वडिलाना जायबदी केल कीं काय या धास्तीनं त्याच धाब दणाणल. तो कावरा बावरा झाला. “दादा ऽऽऽ” श्रीपती वेडचासारखा वडिलाचा शोध करीत निघाला.

“इकडे या!” दोन्ही हाताशी आजोबाच्या भुवयांवर जोराचा दाब देऊन त्यांना सावध करीत असलेल्या मास्तरानी श्रीपतीच लक्ष वेधलं.

“कोन ?” मास्तराचा आवाज ऐकून श्रीपती चमकला.

“मी, मास्तर तुमच्या किसनचा!”

“मास्तर, दादा कुठाय्ती ?”

“इथं, माझ्या माडीवर!”

“मास्तर!” ऐन वेळी वडिलाना सावरायला देवाप्रमाणं पुढ आलेले मास्तर बघून श्रीपतीन अधाशीपणान एकदम पुढ झेप घेतली इतक्यांत धावत आल्यामुळे दम छाटीत व ओठावरून जीभ फिरवीत घाबऱ्या घाबऱ्या राधिकेन मास्तराच्या हातात पाण्याचा तांब्या देत म्हटल, “हे घ्या पाणी!”

मास्तरानी चटकन् राधिकेच्या हातातील तांब्या आपल्या हातात घेतला आणि आजोबाच्या कपाळावर त्यानी पाणी शिंपडल

“मास्तर!” निपचित पडलेल्या वडिलाचा स्पर्श होताच श्रीपतीच्या तोंडचं पाणी पळाल.

“अगबाई! नाडी तरी चालू आहे ना हो मास्तर ?” वडिलाचा आर्त स्वर कानावर येताच राधिकेन दचकून मास्तरावर आपली केविलवाणी नजर रोखली.

“तुम्ही शांत रहा घटकाभर.” मास्तरानी आजोबाना सावध करीत त्या दोघानाहि धीर द्यायचा प्रयत्न केला पण घरात शेवंतीआक्का बेशुद्धावस्थेत आणि बाहेर वडिलाची ही अवस्था, या धास्तीन श्रीपतीची छाती दडपून गेली. वडिलाच्या अंगावर झेप घेऊन त्यान हंबरडा फोडला!

❂ ❂ ❂

: १५ :

'घनश्यामसुंदरा श्रीधरा
अरुणोदय झाला ऽऽऽ'

परसदारीच्या तुळशीभोवताली सडा टाकून रांगोळी घालताना राधिका गुणगुणत होती. कालच्या रात्री ऐन वेळी मास्तरांनी फार मोठी मदत केल्याबद्दल तिचा ऊर आनंदानं भरून आला होता. या निमित्तानं का होईना मास्तर सर्वांना घरांत आवडतील या कल्पनेनं समाधानानं घरात वावरणारी तिची पावलं जमिनीला ठरत नव्हती. शेवंतीआक्कांचा नवरा विठोबा भलतच धाडस करून घरात घुसला, त्यानं आपल्या बायकोला मारलं, तोंडांत बोळा कोंबून तिचा जीव गुदमरून मोडला आणि दागिन्यांच्या डब्याच्या पायी चोर म्हणून त्यानं सासऱ्याच्या घरांत पाऊल टाकलं. राधिकेला वाटलं आता अशा स्थळाबद्दल कुणी नावसुद्धा काढायचं नाही! आजोबाना देखील शेवंतीआक्काचं म्हणणं आता पटेल. आपल्या वडिलाचं ते ऐकतील. शिकला सवरलेला मुलगा बघून मग आपलं लग्न ठरेल.

'हो, मास्तरांना त्यांनी बेशक विचारावंच!' राधिका गाणं गुणगुणता गुणगुणता गालातल्या गालात हसली. मास्तरांशी आपल्या लग्नाच्या वाटाघाटी व्हाव्यात या भावनेनं तिच्या काळजातला आनंद गाण्याच्या रूपानं जिभेवर नाचू लागला आणि म्हणूनच ती स्वतःच्या आवाजावर देखील आज खूष होऊन गेली. एवढच नव्हे, तर आपला हा आनंद शाळेत असलेल्या मास्तरांच्या कानांवर जावा म्हणून देखील तिचा जीव उतावीळ होऊन गेला. एखाद्या चिमण्या पांखराप्रमाणं भुर्रदिशी उडून जाऊन मास्तराना, 'आलें हं मी!' असं म्हणायचा मोह राधिकेनं मोठ्या मुष्किलीनं आवरला. काढलेल्या ठिपक्यांवर रांगोळीच्या पिठाच्या रेघोट्या ओढून नक्षीदार आकृति तयार करताना ती पुटपुटली, 'माझा संसारसुद्धा मला असाच जुळवतां आला तर...तर किती आनंद वाटेल एका माणसाला!'

" पोरी, आक्का हाळी मारतीया. घरांत ये. " श्रीपतीच्या हांकेमुळं राधिकेची समाधि भग पावली. उरलेल्या दोन ठिपक्यांवर भर्रकन् रेघोटी ओढून तिन चिमटीतील रांगोळी सपवली आणि ती चटकन् घरात येत म्हणाली, " पाणी आण म्हणाली का ? "

" बग काय म्हनतीया. "

" बघतें हं ! तीच म्हणाली रागोळी घाल म्हणून. " राधिकेनं वडिलाना कारण सागितल आणि ती शेवंतीआक्काकडे निघून गेली.

"वाइच अशी जवळ ये " शेवती आक्काचा कातर आवाज कसाबसा बाहेर पडला. राधिका त्यांच्याजवळ जाऊन बसत म्हणाली, " काय पाहिजे ग ? "

" तू ! ये, माज्याजवळ ये अशी. "

" पाणी देऊ का ? "

" नग मला, तू जवळ ये " शेवती आक्कांनी भरल्या नजरेन राधिकेकड पहात तिला पोटाशी आवळून धरली. तिला कडकडून मिठी मारीत आपल्या पोटात घालावी या वेड्या भावनेन त्यानी ती गुदमरून जाईपर्यंत तिला घट्ट मिठी मारली

" पोरी " शेवती आक्काचा गळा दाटून आला. रात्रीच्या प्रसगांतून वांचल्यामुळच पुन्हा आपल्या गाठीभेटी झाल्याचा आनद त्या हाकेनच जणू व्यक्त झाला. " दादास्नी लई लागल व्हय् ? " शेवंती आक्कांच्या ओठाची हालचाल झाली.

" लागलय् बरच ! पण मुका मार फार आहे. "

" हळद बिळद लावलीसा का दुकण्या जागव ? "

" नाही बाई ! आयोडीन मात्र लावलय्. " शेवंती आक्कांच्या घट्ट मिठीतून राधिकेन स्वत.ला सोडवून घ्यायचा प्रयत्न केला.

" आयडीन ! कुटल आयडीन ? "

" मास्तरानी–" राधिकेन बोलतां बोलतां जीभ चावली.

" कुटल्या मास्तरान ? आन् त्यो कुटनं आला एकदम त्या येळला ? "

" किसनच्या मास्तरानी की नाही आजोबा पडले त्या जागेवरच त्यांना

उचलून मांडीवर घेतलं आत्या ! अगदीं ऐन वेळेला ते भेटले बघ ! ” मास्तराच्या ऐन वेळच्या मदतीच शेवती आक्कांना कौतुक वाटेल या भावनेनं राधिकेन त्याना माहिती दिली. इतक्यांत श्रीपती तिथ येऊन आपल्या बहिणीला म्हणाला, “ दादाचा वाइच डोळा लागलाय् ! नशीब बलवत्तर म्हनच मास्तरानी सावरलं त्यास्नी; न्हाई तर न्हाई तर कोनत्या थराला गोष्ट गेली असती देवालाच म्हाईत ! मास्तर देवावानी धावून आल म्हनीनास ! ”

“ पन त्यो नेमका कसा आला धावून ? ” शेवती आक्कानी राधिकेकडे थोड्या चमत्कारिक नजरेन पाहिल. राधिकेला ते मुळीच आवडल नाही ती थोडी चिडूनच तिथून बाजूला सरकत मनातल्या मनात पुटपुटली, ‘ एवढी आजारी आहे तरी तिची हीच भाषा ! एखाद्यान उपकार केला तरी ह्या माणसाना त्याचा विधिनिषेधच नाही ह !’ “ पण त्याच वेळी कसा आला मजी ? त्यो बिचारा निगाला हुता कुट तरी त्या वाटन तवा पडली त्येची गाठ ! आला त्यो बग ! लई चागला मानूस अक्की रात त्येनं बसून काडली उशाला दादाच्या ! ” श्रीपतीन मास्तराच्याबद्दल अशी बाजू माडल्यामुळ तिला बर वाटल. तिन कृतज्ञतेची आपली नजर वडिलाकडे वळवली आणि पुन्हा खाली मान केली

“ आन् ही कुटं हुती त्या येळंला ? ” शेवती आक्कानी या कुशीवरून त्या कुशीवर वळत पुन्हा चौकशी केली. त्यामुळं श्रीपती म्हणाला, “ तुज्या न्हवऱ्याच्या आदळआपटीन जागी हून आली वती खाली का ? ”

“ न्हवरा ! ” शेवतीआक्का तडकाफडकी उठून बसल्या. रात्रीचा चोर म्हणजे आपला नवरा विठोबा होता याची जाणीव होतांच त्यांच्या अगाचा थरकाप उडाला. घशाला एकाएकी कोरड पडली डोळे तारवटून गेले. हातापायाच्या मुठीहि किंचित वळल्या.

“ आक्का ! ” श्रीपती घाबरला. राधिकेन शेवतीआक्काना खालीं निजवलं आणि तीहि घाबरून गेली.

श्रीपतीनं बहिणीच्या हाताच्या मुठी सैल करीत राधिकेला म्हटलं, “ च्या आन जा वाईच करून.” राधिका चटकन् सैपाकघरात निघून गेली आणि

तिन कमळाबाईला म्हटल [illegible] नरतीय ग ! नहा आण म्हणाले अप्पा ”

“ अगबाई ग ! ” कमळाबाई [illegible] होती ती तशीच खरकट्या हाताने [illegible] नाय झालं वो ? तुमी काय म्हटलासा ? ”

श्रीपतीन विठोबाचा उल्लेख केल्याचं सांगितलं पण त्यामुळ कमळाबाई त्याच्यावर रागावली त्यान नस बोलायला नको होत ! पण तो बोलला होता आणि म्हणूनच कमाळीनी बावरून ती पुटपुटली “आता डोरव्यात राक कालवू आत्या मजी आटापलच ! ” आणि चहा आणावा म्हणून परत सैपाकघरात आली

इकडं राधिकेन तोवर तवा उतरून चुलीवर चहाच आधण चढवलं होत. आई परत आलेली दिसताच राधिका म्हणाली, “ नवऱ्याच नाव काढल्या-बरोबर बोलता बोलता एकदमच कशी गप्प झाली ग ? आणि नवरा तरी मेला असला कसला ? ”

“ न्हान पोरानी गप बसाव ! न्हाई त्यात त्वांड घालू नी ! ” कमळा-बाईन लेकीवर डोळे वटारले पण तिकडे दुर्लक्ष करीत राधिका पुन्हा म्हणाली, “ खर साग. माझ्या लहानपणाचा तीनतींनदा उच्चार करून गप्प बसवू नकोस शपथ आहे बघ माझी सांगितलं नाहीस तर ! ”

“ सुटली म्हन ! ” कमळाबाईन राधिकेचा हात धरला

“ नाही म्हणणार ! ”

“ माजी शप्पत सुटली म्हन ! ”

“ शक्यच नाही ”

“ कार्टे ऽऽ म्हनतीस का न्हाई सुटली ? ” कमळाबाईन राधिकेचा कान पिरगळला पण राधिकेन आपला हेका मुळीच सोडला नाही तिला आपल्या आत्याची खरी हकीकत ऐकायची उत्सुकता होती त्यासाठी कोणतीहि शिक्षा भोगायला आज ती तयार झाली होती आणि म्हणूनच आपल्या आईवर चिडून ती म्हणाली, “ असल्या दरोडे घालणाऱ्या नवऱ्यान टाकून दिली होय तिला ? ”

"पोरी !" कमळाबाईनं लेकीवर पुन्हा डोळे वटारून तिला गप्प बसायला सुणावलं. नणदेन ते ऐकलं तर भलतंच व्हायचं या धास्तीन तिचा जीव खालीवर होऊ लागला. पण राधिकाहि आज भलतीच हट्टाला पेटली, "खरं सांगितल्याशिवाय चहा देणार नाही मी तिला आणि सुटली तर मुळीच म्हणणार नाही."

कमळाबाईन काही न बोलता आपल्या डोळ्यांना जोराचा तणावा दिला. मनातल्या मनात ती बोलू लागली, 'खरं सांगू हिला ? दिवान साब सासरीं गेल्या व अंगावरचं डाग काढून घेतलं ह्या न्हवऱ्यान आन् त्यंच्या राडाव भावजन त्येचं सुक एकलीला पैल्यावानीच मिळाव म्हन यीक घालायला बी कमी केलं न्हाई. ह्ये सांगू हिला ? म्हायारामंदी पैसं आन्, न्हाई तर जित्ती मारतो म्हन अंगावर धावून येऊन लेकीला फोकळून काडली जावायानं म्हन् रागारागान म्हायारला मामाजींनी कायमची लेक आनली ह्ये का सांगू ह्या पोरटीला ? . .'

"नग नग ! मला काय इच्यारू नगस. पाया पडते, पर सुटली म्हन !" कमळाबाईन काकुळतीला येऊन राधिकेला उराशी कवटाळली इतक्यात श्रीपतीची हाक आली, "च्या झाला का न्हाई अजून राधे ऽऽऽ ?"

"जा घेऊन तूच !" राधिकेन तिरस्कारान आईचा हात झिडकारला; पण तेवढ्यात श्रीपतीन तिला पुन्हा हाक दिल्यामुळं ती चरफडत तिथून आत गेली आणि न बोलताच तिनं थोड्या झटक्यानंच चहाची कपबशी वडिलांच्या पुढ्यात ठेवली.

शेवतीआक्का एव्हांना सावध झाल्या होत्या. त्यामुळं बशीत चहा ओतून त्यांना तो पाजीत श्रीपती चिडून म्हणाला, "भडवा घावला न्हाई ! न्हाई तर राई राईएवढं टुकडं करून हातंच का न्हाई केला असता !"

"गप बस गिरपू ! माज्या कुकवाला नग हात लावूस !" शेवतीआक्कानी तोंडाची बशी बाजूला करीत भावाकडे रोखून पाहिलं. त्यांच्या नजरेला नजर भिडवीत श्रीपतीन उरलेला राग आणखी एकदा ओतून टाकला, "आता ह्यो फाकड्या कुनाचं ऐकायचा न्हाई ! माज्या हातानं दिकुन तुजं कपाळ . ."

" शिरप्या ! " शेवंती आक्कानी श्रीपतीला पुरत बोलू देण्यापूर्वीच त्याच्या खाडकन् मुस्काडात मारली आणि त्या कोलमडून पडल्या. इतक्यांत नेहमीप्रमाणं घाईघाईनं घरात घुसत झेल्या मोठ्यान ओरडला, " आक्का; पळ लौकर ! "

" काय आहे रे ? " राधिकेनं गडबडीनं पुढं होत झेल्याला दारांतच थोपवून धरला.

" मास्तरानी पुस्तक लिहिलंय् ! " खाकोटीला मारलेली वही मोठ्या उत्सुकतेन राधिकेपुढ धरली.

" खरच ?" राधिकेच्या ओठावर हसू चमकल. आधाशीपणानं झेल्याच्या हातातील वहीवर झडप घालीत ती झपाट्यानं माडीवर पळाली. घाई-घाईनं तिन झेल्याला विचारलं, " आणि ते कुठ आहेत रे आता ? "

" ते ? कोण ग ? " झेल्यान तोडाचा चबू केला. पण त्याला काही सांगण्याऐवजी " चावटच आहे मेला ! " असं पुटपुटत आणि उमन्या रागान त्याच्याकडे पहात राधिकेन मुरका मारला.

" म्हणजे मास्तरांबद्दल म्हणालीस ? " झेल्यान कमालीच्या आश्चर्यानं अर्धवट हास्य करीत राधिकेकडे पाहिलं. तिनं मदस्मित करून त्याच्याकडे बघत त्याच्या पाठीत हलकासा रपाटा घातला आणि म्हटल, " येडाच आहे मेला ! "

" आणि तू ? " झेल्या खदखदून हसत आणि मिस्किलपणान राधिके-कडं बघत टाळ्या वाजवीत पळाला. पण त्यामुळ चिडून त्याला काही न बोलतां अगर त्याच्यामाग न धावता राधिकेन ती वही उघडली.

सुरवातीचं एक पान कोरं सोडून मास्तरानी आपल्या नेहमीच्या पद्धतीनं उभट आणि रेखीव अक्षरात लिहिलं होतं—

" काल रात्री मी अगणात एकटाच फिरत होतो. किती वाजले होते कळेना. थोड्या वेळानं कोंबडा आरवला. म्हणजे प्रहरभर रात्र असावी. पाऊस थांबला होता. केळांब्याच्या डोक्यावर चद्र होता. ढगाबरोबर तो लढत होता. क्षणात ढगांच्या लाटात तो बुडे, गुदमरे. त्याच्या धडपडीचा प्रकाश ढगातूनहि थोडा थोडा दिसे. परतु क्षणांत अजिबात दिसेनासा होई.

तो पुन्हा तोंड वर करे आणि हसे. मी बघत होतो. आपले मन असेच आहे. अधाराशी, निराशेशी ते झगडत असते. क्षणात निरुत्साही विचार त्याला बुडवतात, तर पुन्हा उत्साहाचे त्याला भरते येते. मोठी गमत आहे. जीवन म्हणजे ओढाताण ! परतु आपण विजयी होऊ या श्रद्धेनेच धडपडत राहिले पाहिजे. आत्मविश्वास हवा. ज्याचा स्वत.वर विश्वास नाही, त्याच्या जीवनाला काय अर्थ ? तू स्वत वर विश्वास ठेव. "



: १६ :

" किशा, लेका आज आक्काला आणायला पाहिजे होती ही मजा बघायला ! तो बघ किती उच गेला माझा पतग ! "

आभाळात उचच उंच गेलेल्या पतगाची दोरी तो आणखी उच जावा म्हणून सैल करीत झेल्यानं हातातील गुडाळ दोन्ही हातांत धरल आणि मोठ्या अभिमानानं किसनकडे पाहिल.

" हं ! आता आक्काची बात सोडून दे ! " किसनन आभाळात भरारी घेणाऱ्या पतगाकडे दृष्टि वळवून झेल्याच्या कल्पनेला खोडून काढलं.

" म्हणजे ? "

" म्हणजे काय ? आता ती आपल्याबरोबरच काय, पण कुणाबरोबर-सुद्धां घराबाहेर येईल की नाही शका आहे ! "

" अरे, पण का ? " वाऱ्याच्या वेगान तोल जाईल म्हणून झेल्यानं पतंगाची दोरी भरभर थोडीशी गुडाळली आणि गुडाळ किसनच्या हातांत दिलं. किसन उभा होता तो खाली मातीत बसला दोन्ही पाय पसरून मध्यें त्यानं दोन्ही हातातील गुंडाळ गच्च आवळून धरल आणि म्हटल, " बाबा काय म्हणाले ठाऊक आहे ? "

" अं हं ! " झेल्यानं कांहीच माहीत नसल्यामुळं नकारार्थी मान हलविली.

" दोन तीन दिवसापूर्वी आमच्या घरात चोर शिरला होता. "

" ते ठाऊक आहे! आणि तो चोर म्हणजे तुझ्या शेवतीआक्काचा नवरा होता हेहि कळलय् मला. बर, मग त्याच काय ? "

" तर त्याला मारायच म्हणून आमचे बाबा अधारातून पळत जात होते. ते कशाला तरी ठेचकळून रस्त्यात आदळले ! "

" हं, पुढ ? "

" तर की नाही त्या वेळी आपल्या मास्तरानी त्याना ऐन वेळी सावरून धरल. "

" आपल्या विश्वासराव मास्तरानी ? "

" हो त्यानीच. "

" मग त्याच काय ? "

" सागतो ना तर दुसऱ्या दिवशी बाबा आमच्या अप्पाबरोबर बोलताना म्हणाले की–"

" काय म्हणाले ? साग, साग "

" म्हणाले की, आपले मास्तर ज्या अर्थी नेमके त्या वेळी त्याच रस्त्यानं आले, त्या अर्थी त्या चोराबरोबर तेहि सामील असले पाहिजेत ! "

" असं म्हणाले ? " झेल्याला कमालीच आश्चर्य वाटल आणि म्हणूनच तो पुन्हा म्हणाला, " छे ! शक्यच नाही "

" अरे, पण बाबा म्हणतात ना तस ! "

" मग तू म्हणायच नाहीस आमचे मास्तर तसे नाहीत म्हणून ? "

" ह ! मला विचारतय् कोण ? पण आक्का मात्र अप्पाच्याजवळ म्हणाली तस "

" मग ? तिन बाबाना नाही सागायच सगळ तस ? "

" लेका ऽ तुला ठाऊक नाही ! " किसनन हाताला थोडी ओढ लागली म्हणून गुडाळ क्षणभर बाजूला ठेवल आणि पुन्हा सागितल, " अरे, बाबा आणखी असं म्हणाले की, आमच्या आक्काला रात्रीची पळवून न्यायला मास्तर आले होते ! "

" अरे हुडुत ! बाबाचं डोक आहे की खोक ? आक्काला कशाला पळ-

वून नेणार मास्तर ? " झेल्या खटयाळपणानं आजोबाच्या कल्पनेवर हसला. पण किसन तितकाच गंभीर होऊन गुडाळ पुन्हा नीट धरीत खाली खाली येणारा पतंग पुन्हा वर चढावा म्हणून उभा रहात म्हणाला, " ते म्हणाले की, मास्तराना आमच्या आक्काबरोबर लग्न करायचंय् ! "

" खरंच ? " झेल्या मास्तराचं आणि आक्काचं लग्न होणार या नुसत्या कल्पनेनं देखील एकदम बेहद्द खूष झाला आनंदातिरेकानं टाळी वाजवून त्यानं काहीतरी आठवल्यासारखं केलं. मास्तरानी त्या वहीत लिहिलेल्या मजकुराचा या कल्पनेशी संबंध असावा अशी कल्पना त्याच्या मनाला चाटून गेली.

" किती छान होईल नाही किशा तसं झालं तर ? आपण मग मास्त-राच्या घरीच रहायला जाऊं, नाही का ?" झेल्याला मनस्वी आनंद झाला. त्या आनंदाच्या भरात किसनच्या हातातील गुडाळ बाजूला फेकून त्यानं त्याच्या दोन्ही खांद्यावर आपले हात रेलून त्याच्या डोळयात पाहिलं.

किसननं मान वर करून झेल्याकडे पाहिलं आणि थोडं सुद्धा न हसता थोड्या चिडक्या आवाजातच तो म्हणाला, " पण लग्न तरी आधी होऊ दे आक्काचं ! अरे लेका ऽ मास्तराशी तिचं लग्न होऊ नये म्हणून तर बाबाचा संताप उडाला आहे ! आणि मास्तराची गाठभेट पडू नये म्हणून तर ती घराच्या बाहेर येणार नाही आता ! आणि तू लागला आहेस एकदम तिच्या घरात शिरायला ! "

" पण बाबाच्या बापाचं काय जातय् मास्तराच्या बरोबर आक्कानं लग्न केलं म्हणून ? "

" कुणाला माहीत ? "

" आक्का काय म्हणते रे ? " झेल्यानं उत्सुकतेनं चौकशी केली तेव्हा मात्र किसन खुदकन् हसून म्हणाला, " तिला विचारलं तर ' फाजीलच आहे मेला ! ' असं म्हणून माझ्या पाठीत धम्मक लाडू घालून धूम पळाली. "

इतक्यात पतंगाची दोरी अगदीच ढिली झाली आणि तो जमिनीवर येऊन थोड्या अंतरावर पडल्यामुळं झेल्या पुढं धावला. पण पतंग थोडा

फाटला होता; म्हणून तो जोडायचा प्रयत्न करीत झेल्यानं किसनच्या अंगावर फेंकला आणि एकदम तिथून पळत जात त्यानं त्याला ओरडून सागितलें, " मी मास्तरांना विचारून येतो हं, आत्तां आक्काबरोबर लग्न करतां का म्हणून ! "

आणि त्याच वेळी तिन्हीसांजा झाल्या म्हणून लावलेल्या समईच्या उजेडाकडे बघून नमस्कार करीत शेवती आक्कानी राधिकेला खडसावून विचारलं, " दादा म्हनत्यात तें खरं हाय ? "

" मला काय विचारतेस ? " राधिकेनंहि तिरस्कारानं शेवती आक्कांकडे पाहिल.

" मजी ? मास्तर आला कसा मग अवचित ? "

" आत्या, मला पळवून नेऊन तुम्ही म्हणता तस लग्न करायला मास्तर कांही नामर्द नाहीत ! राजरोस लग्न करायची ताकद आहे त्याच्यात. "

" अस काय ? ठरल्याल दिसतय् मग तुमच ? तरीच ! तें कार्टं मास्तरच नाव घ्यायचा अवकाश, न्हवरी हुतीयास अक्षी. " शेवती आक्कानी दात ओठ खात कपाळावरील जखम हलक्या हातानं दाबली.

" हं ! हा सगळा तुमचा खेळ ! मीं मास्तराना कधी विचारल नाहीं की त्यांनीहि मला तसं चुकून सुद्धा विचारलं नाही ! ऐन वेळी मदत केली त्याची फेड चागली करताय् ह तुम्ही लोक ! आणि तुझ्या नवऱ्यान इतकं केल तरी–" राधिकेचा तोल सुटला. तिनं कमालीच्या तुसडेपणान शेवती आक्काकडे पाहिल आणि ती चटकन् तिथून निघून गेली.

' काय रं माज्या नशिबा हें ! एवढ्याशा कार्टीन दिकुन बोलून दावायची येळ आनलीस ! ' शेवंती आक्कानी रागारागानं आपल्या कपाळावर बडवून घेतलं, खसाखसा हातपाय घासले, दात ओठ खात हाताचीं बोटं मोडलीं आणि दाण्‌दिशीं आपलं अंग भुईवर टाकून दिल.

' भाड्या शिरला कसा घरात चोर म्हनून ? ' शेवंती आक्काच्या अंगाचा भडका उडाला. ज्या नवऱ्याच्या नावचं कुंकू कपाळावर कायम पाहिजे म्हणून त्यानी श्रीपतीच्या मुस्काटांत मारली, त्याच नवऱ्याबद्दल त्याना मनस्वी चीड आली. सारं घरदार, शेजारी पाजारी आतां याच एका

गोष्टीचा उच्चार एकसारखा करणार आणि आपणाला हिणवणार या भावनेनं त्याच्या काळजाच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडून गेल्या. संतापाच्या भरांत स्वतःच्याच थोबाडीत मारून घेत त्या पुटपुटल्या, 'खाली बगायची येळ कशी ग ऽऽ आनली हृचा मुड्यानं. सारं गाव काय म्हनील ? उद्यां हृया कार्टीचं लगीन निगालं मजी मानसं म्हनाय कमी करायची न्हाईत, पावनं पै कसलं हाईत हेच ठाव हाय..जाम नगो त्या घरातली पोरगी. देवा, माज्या जल्माचं एवडं धिडवड करस्तोंवर जलमली तवाच नरडीला नक कां न्हाई लावलंस माज्या ?'

इतक्यात झेल्या पळत पळत तिथं येत म्हणाला, "आक्का कुठाय् ?"

"का र मुड्या ? कशाला पाइजे ?" शेवती आक्काचा राग झेल्यावर उसळून आला. त्यामुळं झेल्यालाहि चीड आली. रागारागानं शेवती आक्काच्या कडे पहात तो ओरडला, "मला मुड्या म्हननारी तू कोन ? तुज्या चोरटचा न्हवऱ्याला म्हन की !" आणि तिथून तो पळून गेला.

"भाड्या ऽऽ थाब तुला दावतो." शेवती आक्काचा अपमान झाला. त्यांनी शेजारी पडलेलं एक भाडं झेल्याच्या अंगावर फेकलं; पण झेल्या तें भाडं अगावर यायच्या आधीच तिथून पळाला होता. त्यामुळ त्याचा तड-फडाट झाला. "भाड्या आजपसनं घरात यिऊं दे तरी; हृचेच्या बडबडीनंच कार्टी मास्तराला नादावली."

पण मास्तरांच्या नांवाचा उच्चार होताच त्या एकदम थांबल्या. त्याच्या नजरेसमोर हसतमुखानं सायकलवरून जाणारे मास्तर उभे राहिले. 'खरंच, मास्तर असल का असा ?' त्याचा त्यांनीच प्रश्न विचारला आणि अखेर त्यांचं त्यांनीच उत्तरहि दिलं, 'वरनं तरी तसा न्हाई वाटत. मग कुनी सांगावं ? पर आपली पूरगी आपून आवरली मजी बास. मग कसा का असंना त्यो ! असल्या घरांत नग ग बाई आमची पूरगी. मास्तर असला म्हन काय सोनं तर न्हाई लागलं त्येच्या अंगाला ?'

०.०.०

# : १७ :

" रामराम पाटील ! "

" रामराम, रामराम. या, बसा. आज काय काम काडलंगा ? "

" आलो वतो आपला असाच. म्हटलं, लई दी झाली गाट पडून, तवा जावावं समाचाराला. तशात अशी आवाई उटली की पाटील पडलं जावा-याच्या मागनं पळताना ! "

" तुमास्नी कुनी सांगितलं ?"

" अवो, सारं गाव म्हनतया म्हनं मीबी म्हनतूया बिचारा मास्तर आयत्या येळला आला म्हनं तुमी शाबूत तरी आलामा घराला ! लई वाईट तुमच्या घरांत चोरी करावी मजी लई वाईट गोष्ट काय व्हेल बिल का वो ?"

" चालता हो माज्या म्होरनं ! "

गांवांतील एका माणसानं विशेष चौकशी सुरू केल्यावर आजोबांचा तिळपापड उडाला. ते एकदम त्या माणसावर खेकसले. त्यामुळं तो बिचारा ओशाळला, घाबरून मागं सरकला आणि आश्चर्यानं त्यांच्याकडं बघूं लागला.

" जा म्हतूया न्हव का ? " आजोबा त्या माणसावर पुन्हा तुटून पडले. हवा भरलेला रबरी फुगा हवा गेल्यावर एकदम आकसून जावा तसा तो माणूस चुटकीसरशी आणखी मागं सरकून हातपाय पोटाशी धरून भिंतीला टेकला. कधी नव्हे तो म्हातारा आज असा एकदम कां भडकला याचा त्याला मोठा अचबा वाटला तोंडात बोट घालून तो आश्चर्यानं थक्क होऊन गेला. अगोदर कल्पना नसतांना अचानक धरणीकंप व्हावा तसंच कांहीसं त्याला वाटलं आणि म्हणूनच भीतभीत त्यानं म्हटलं, "कावत्यायसा का वो ? म्यां काय–व्हय सारं गाव–" पण आजोबाचा एकेक डोळा त्याच्या-वर फिरू लागल्यानं त्यानं तिथून पळता पाय काढला दरवाजाबाहेर पड-तांना कुठून आपण ह्या माणसाकडे आलो या गोष्टीचा पस्तावा होत असतांनाच तो चिडून पुटपुटला, " मानूस हाय का हैवान् ? सल्ली चौकशी

करावी म्हन आलों तर माज्यावच उटला सैतानावानी ! आमच्या बाचं काय जातय् ह्यो मेला म्हणून तरी."

" कोण आलं होतं बाबा ? " बाहेर पडणाऱ्या त्या माणसाकडे पहात पहात किसन आजोबाच्या खोलीत शिरला पण आजोबाच मस्तक अजून शात झाल नव्हत म्हणून किसन समोर आलेला दिसताच त्यानी त्याच्या-वरहि तोड सोडलं, " आजपसन तुजी शाळा बद ! नाव नको त्या मास्त-राच ! ज्यो येतूंय त्यो म्हनतूया बिचारा देवावानी भेटला ! मला सारं ठाव हय् त्येच. चोराला चोर सामील लेकाचा ! "

आजोबाच्या या दणक्यान किसनच एकदम आइस्क्रीम होऊन गेल. तो चांगलाच हादरला. मास्तराच्या बरोबर कुठं तरी ट्रिपला शाळेतून जायचं म्हणून पाच रुपये आणि जाण्याची परवानगी मिळवायला म्हणून तो आजोबांकडे आला होता ! पण त्यान तोंड उघडायच्या आधीच आजोबानीं हा बार उडवल्यामुळ त्याची दातखिळीच बसली.

" किशाऽ बोल, मास्तर तुला काय काय सागतो, शिकिवतो ? " आजो-बानी समोर उभ्या राहिलेल्या किसनचा कान धरला. उठून उभ ऱ्हावत नव्हतं तरी तशीच कळ सोसून त्यानी किसनची हनुवटी वर करीन आपली रागीट नजर त्याच्यावर रोखली इतक्यात झेल्या किसनला शोधीत तिथं येत लाबूनच ओरडला, " मास्तर कबूल आहेत रेऽऽऽआपण नुसते पाघरा-यचे कपडे–" आणि आजोबाच्या खोलीतील तें दृश्य बघून त्यान एकदचा आश्चर्यान त्या दोघाकडे पाहिल की, पुढचे शब्द हवेतच विरून गेले

"काय रे ये म्हसोबा ! हिकड येतूस का न्हाई ?" आजोबानी झेल्याला शिवी हासडली पण झेल्या जागच्या जागीच थबकला. पुढ जायची त्याला छाती होईना. त्यामुळ किसनचा कान सोडून झेल्याजवळ येत आजोबा म्हणाले, " कशाला कबूल हाय र मास्तर तुजा ? "

" अ ! आक्काबरोबर..हो..तिच्याबरोबर लग्न करायला ! " झेल्याला भान राहिल नाही मास्तराच आणि राधिकेचं लग्न केव्हा एकदा होईल हाच विचार त्याच्या डोक्यात सारखा घोळत असल्यामुळ सहलीच्या बेताचा

विसर पडून त्यान भलत्याच गोष्टीचा आजोबांच्या पुढ उच्चार केला. त्यामुळं " झेल्या ! " किसनचं धाब दणाणल.

" भडव्या, हेच शिकतूस व्हय शाळत?" आजोबांच्या डोळ्यातून आगीच्या ठिणग्या पडू लागल्या. त्यानी चवताळलेल्या वाघाप्रमाणं झेल्यावर एकदम झडप घातली पण त्याचा नेम चुकवून झेल्या मोठ्या शिताफीनं निसटला. धरणीला पाय ठरू नये इतक्या वेगान त्यानं ती जागा सोडली; पण आजोबाचा तोल गेला. आधीच वाकलेली काठी पुन्हा ढिली पडली.

" बाबा पडले. पळा, पळा. " किसनन घरात मोठ्यान पुकार केला.

" अग बाई, काय झालं ? " शेवती आक्का माळीतून लगबगीनं पुढं आल्या. त्यांच्या मागोमाग राधिकाहि आली. झटपट पुढ होऊन तिनं आजोबांना उठवत विचारलं, " घेरी आली का ? "

" चालती हो माज्या म्होरनं !" तशा स्थितीतहि आजोबांना अवसान चढल.

" म्हणजे ?" राधिकेला कमालीचा धक्का बसला.

" दादा !" शेवती आक्काचीहि बोबडी वळली. तरी पण आजोबाचा भार आपल्या अंगावर घेत त्याना टेकण देऊन शेवंती आक्का म्हणाल्या, " झालं काय पर एवड अवचित ?"

" तू बी काळ कर ह्या घरातनं ! चावाट केलीस पोरं त्वां !" आजोबांनी आपल्या लेकीलाहि बोलायला कमी केलं नाही.

शेवती आक्का ह्या बोलण्यान एवढ्या मोठ्यानं दचकल्या की, त्यांना सावरण्यासाठी राधिका एकदम पुढं धावली.

" थांब तितंच ! साऱ्या अब्रूच धिडवड काडायचा ब्योत केलायसा त्वां. पर ह्यो म्हातारा जित्ता हाय तवर त्या मास्तराची नुसती नजरभेट दिकुन व्हनार न्हाई ! जित्ती पुरून टाकीन. " आजोबांनी राधिकेला पुढं यायचा प्रतिकार केला.

राधिकेच्या काळजालाच आजोबांनीं हात एकदम घातला. त्यामुळं तिच्या डोळ्यांतूनहि एक जोराची सणक निघून गेली. तिरस्कारानं त्या दोघांकडं पहात ती चटकन् बाजूला झाली आणि पुटपुटली, " मास्तरांच्या

नांवानं का ह्यांनी शख करावा, कळत नाही ! आणि त्यानी मनावर घेतलं तर ते थोडीच भीक घालणार ह्या धमकावणीला ? "

" तुमी वाइच गप बसत जावा !" राधिका निघून जातांच शेवंती-आक्कांनी वडिलाना नीट झोपवीत त्याची समजूत घातली. पण आजोबांना तें खपलं नाहीं. झटपट उठून बसत त्यानी लेकीला विचारल, " आन गप बसून तुमचा ह्यो शनीमा बगत बसू, असंच न्हवं का ? तुज्या नवऱ्यानं साऱ्या गांवभर डका केला. आता हिच्या पायांत डोस्कं फिरूं दे मजी सुटलों मी बी !"

" दादा, मीं का त्यास्नी चोरी करा म्हटलं व्हय तवा मला बोल-तासा ?" शेवंतीआक्का गहिंवरल्या.

" तुजी खात्री वाटल्याशिवाय छाती झाली का त्येची घरांत शिरायची? आन् तुजी फूस असल्याबिगार ह्यो मास्तर बी हिच्या नादी लागला काय? चांगला पांग फेडताय ! "

" दादा ! शप्पत हाय असं काय बोलचीला तर माज्या गळ्याची ! खरं खोटं काय तें नीट बगून मग डोस्क्यांत राक कालवून घ्या." शेवती आक्काहि वडिलांवर भडकल्या. त्यांना हें बोलणं सहन झालं नाही. वडील-कीची मर्यादा ओलांडून त्या क्षणाला वडिलांच्या नरडीचा घोट घ्यावा म्हणून संतापाच्या भरांत त्यानी डोळे तणावून हात पुढं केले.

" जीभ हासडून दीन ! मला तू शिकवितेस ?" आजोबानी शेवंती-आक्कांच्या तोंडांत जोरानं भडकावली. त्यांचं अंग रागानं थरथरूं लागलं. सर्वांगाचा भडका उडून गेला. स्वतःच्या मुलापेक्षांहि अधिक प्रेमानं वाग-वलेली लेक या वेळीं त्यांना नजरेसमोर देखील नकोशी झाली.

शेवतीआक्का हुंदक्यानं दाटल्या. स्वतःच्या नशिबाला दोष देऊन त्यांनीं मुकाट्यानं ठेलणेंतून पाय काढला.

" जा ! मेलीस तरी डोळ्यांत टिपुस याचा न्हाई फाकड्याच्या ! " आजोबांनी लेकीवर आणखी एकदा तोंडसुख घेतलं आणि चरफडत तोंडा-वर पांघरूण घेऊन ते पडून राहिले.

"ह्येला जमीनजुमला न्हाई, आईबा न्हाई, भनभाऊ न्हाई, गनगोताचा

तरी पत्ता हाई का न्हाई कुनाला ठावं ? आन असल्या दळभद्र्याला त्येच्या नुसत्या मास्तरकीवर भुलून पोरगी द्याची ? खाईल काय पोरगी जन्मभर ? का तिलाबी मास्तरीन करून गावन गांव टिपीत फिरनार ह्यो लेकाचा ? तें काय न्हाई उद्याच्या उद्या ठरवितों हिचं लगीन. अगदी नांगरगट्ट्या मिळाला तरी बेहत्तर ! एका रातींत मांडव घालतों, त्याबिगार डोळ उगडायचं न्हाईत ! आन त्या सटवीलाबी दाल्ल्याच्या घरला देतों लावून ! मेली तर मरूं दे त्या इटचाच्या दारांत ! लेक न्हाई म्हन मुकात न्हाईन मी ! ” आजोबाच्या अंगाची लाही लाही होऊं लागली या अगावरून त्या अगावर होतांना त्यांना धरणी ठाव देईना. त्यांच्या सगळ्या अगाचा भडका उडून गेला.



## : १८ :

“ अरे, तू कशाला आलास ? ” शाळा सुटल्यानतर मास्तर सायकल-वरून घरी निघाले असतां झेल्या त्यांच्या मागोमाग पळत येत होता. मास्त-राना आश्चर्य वाटल. पळत येणाऱ्या झेल्याची पावल आतां त्यांच्या परि-चयाची झाली होती. म्हणून त्यानी मागं वळून पाहिलं आणि झेल्या दिस-तांच ब्रेक दाबला.

“ कशाला आलास ? कांही काम आहे ? ” मास्तरांनी झेल्याला पुन्हा प्रश्न केला. झेल्यान पाठीवरच गाठोड नीट आवळून धरल आणि तो मास्त-रांच्या कानांत पुटपुटला, “ आज तुम्ही फार सावध राहिलं पाहिजे ! ”

“ कारण ? ”

“ आक्कांच्या मळ्याजवळ..”

“ तिथं काय ? ”

“ तिथं तुम्हाला मारायला टपलेत लोक. ”

“ अस्सं ? कारण ? ”

" कारण ? कारण मग सांगतों. कोण लेकाचा तुमच्या केसाला धक्का लावतो ते बघतो मी ! " झेल्याची नजर तारवटली. मास्तरांच्याकडे टक लावून पहात त्यानं आत्मविश्वासान आपली छाती फुगवली आणि पुन्हा म्हटलं, " तुमी चला, पण अगदी जलदीनं ! "

" अरे, पण कारण काय ? " मास्तरानी झेल्याच्या बोलण्यावर अविश्वास दाखविला आणि ते मोठ्यान हसले.

" हसू नका मास्तर ! अगदी जिवावर बेतलय् म्हणतात तुमच्या ! " झेल्या गभीर झाला. तरीहि मास्तर त्याला हसले आणि म्हणाले, " वेडा कुठला ! माझ्या वाटयाला रे कोण कशाला जाईल ? "

" खरं आहे मी म्हणतो ते आणि म्हणून मी हे दगड गोळा करून आणलेत ! " झेल्यानं पाठीवरचं गाठोडं नीट सावरल.

" दगड ? कशाला रे ? " मास्तर पुन्हा हसले. त्यामुळ झेल्या चिडला आणि मास्तरांच्याकडे रागान पहात म्हणाला, " इतका जीव तोडून सागतोंय् तरी थट्टा वाटते होय ? कशाला म्हणजे तुम्हाला कुणी मारायला आलच तर त्याच्यावर भिरीरी फेकायला हो ! "

स्वतःची काळजी घेऊन आपला जीव धोक्यांत घालणाऱ्या झेल्याचं मास्तरांना कौतुक वाटल. त्याच्या डोळ्यात आनंदाश्रु तरारले. प्रेमानं झेल्याला एका हातान जवळ ओढीत ते म्हणाले, " तू जा. माझी काळजी करूं नकोस. "

" नाही, नाही ! आक्कान मला सागितलय्. म्हणाली, मास्तराच्या मागं अस सारखा ! " झेल्या पुन्हा गभीर झाला आणि त्यान आपला निर्णय रोख सवाल टाकावा तसा मास्तराच्या पुढं सांगून टाकला. त्यामुळं मास्तरहि मनांत थोडे चरकले. क्षणभर स्वतःशीच विचार करीत त्यानीं झेल्याकडे रोखून पाहिल, तेव्हां झेल्याच हलक्या आवाजांत म्हणाला, " मास्तर, तुम्ही त्या दिवशी आक्काला पळवून नेणार होता होय ? "

" म्हणजे ? " मास्तराना मोठ चमत्कारिक वाटलं. त्यांनीं आश्चर्यानं झेल्यावर आपली नजर पुन्हा रोखली.

" बाबा म्हणाले की, चोराला तुम्ही सामील असल्याशिवाय एकदम

आला कसे त्या वेळी ? आणि याशिवाय असेंहि म्हणाले कीं, आक्काला पळवून न्याव म्हणून वेळ साधून पाळतीवर असाल तुम्ही ! "

" खरच ? अस म्हणाले ? " मास्तराना धक्काच बसला.

"हो; किसननं मला सगळं सागितलं ! आणि म्हणून–म्हणूनच तुम्हांला कुणीतरी–" झेल्याचं तोंड आपल्या आवडत्या गुरुजीवर येणाऱ्या प्रसगानं काळवडून गेल. त्याच्या छातीत जोराची धडधड सुरू झाली. त्यामुळं आपल्या ओठावरून जीभ फिरवीत तो मास्तरांना म्हणाला, " तुम्ही आज नाहीं तर माझ्या घरी चला. "

" छे ! वेडा आहेस ! " मास्तरांनीं उसनं हास्य करीत झेल्याची समजूत घातली. पण झेल्याला तें पटलं नाही. तो मास्तराच्या पुढं होऊन त्यांची वाट रोखीत म्हणाला, " चला घरी; नाही तर मी येणार ! "

मास्तराचं डोकं सुद होऊन गेलं. काय बोलावं, काय कराव याचा त्यांना चटकन् निर्णय घेतां येईना. ते नुसते झेल्याकडे बघत राहिले आणि मग दुसऱ्याच क्षणाला, " तू जा; मी जातों आतां. " असं झेल्याला बजावून त्यानी जाण्यासाठी म्हणून सायकल नीट हातांत धरली. पण झेल्या सायकलची पुढची दाडी धरून म्हणाला, "मग मी येणार. बाबांना तुम्ही नको असला तरी मला पाहिजेत ! मी तुमच्यासाठी काय वाटेल तें करीन मास्तर. "

" अरे, असं काय वेड्यासारखं ? मला कोणी कांही करीत नाहीं; चल. " मास्तरानी झेल्याची पुन्हा समजूत घातली आणि ते झटक्यानं पुढं निघून गेले.

" मास्तर ! " झेल्या सायकलमागून पळू लागला. पण मास्तरांनीं सायकलचा वेग बराच वाढवल्यामुळं झेल्याची हांक त्यांना ऐकू गेली नाहीं. झेल्या पळतां पळतां थांबला. त्यानं दूरवर पाहिलं. मास्तर वेगानं जात होते आणि एव्हांना त्यांनी राधिकेच्या मळ्याची सीमाहि झपाट्यानं ओलांडली होती ! झेल्याचा जीव खाली पडला. मास्तर सही सलामत पुढं निघून गेल्याचा त्याला आनंद झाला. समाधानाचा श्वास टाकीत त्यानं हातांतील गाठोडं दूर भिरकावून दिलं.

त्याच वेळीं शेवंतीआक्का राधिकेनं फेकून दिलेल्या भुईमुगाच्या शेंगा माळीत गोळा करून पुटपुटत होत्या, ' आपलंच नशीब खोटं ! त्यांत दुसऱ्याला बोलून उपेग काय ? त्यो मुडदा आला नसता चोरी कराय् तर ह्या कार्टीनं तरी कां पुढ्यातल्या शेंगा खावून माजल्यावानी भिरकावल्या असत्या? '

विठोबाच्या त्या दिवशीच्या भलत्या साहसाबद्दल घरांतील प्रत्येक माणूस शेवंती आक्काना टोंचून बोलत होता. त्यांना ते बोलणं वर्मी घाव बसावा तसं बोचत होतं. तशांत आजोबांनी देखील त्यापायी घरांतून बाहेर जायची भाषा काढल्यापासून अन्नपाणीदेखील त्याना गोड लागेनास झालं होतं. आपल्या जन्मांत काही अर्थ नाही याची त्यांना सारखी जाणीव होत होती. जीव रमावा म्हणून माजरांना प्रेमानं दूध पाज, जवळ घे, वाकळ शीव, कशीदा काढ, मळ्याकड जा, राधिकेला पोटाशी घे, घरातील आहे नाही पहा, या अशा गोष्टीत देखील त्याना आनद वाटत नव्हता. उभं आयुष्य एखाद्या पुरुषाप्रमाण कष्ट करून वडिलांच्या घरांत काढल तरी शेवटीं खुद्द वडिलांनीं सुद्धा घराबाहेरचा रस्ता रागांत का होईना दाखवावा, याबद्दल त्या बऱ्याच निराश झाल्या होत्या. गेले चार पांच दिवस त्याच्या सुतकी चेहऱ्यावर चुकूनही हंसू उमटल नव्हत. त्या कुणाशी धड बोलल्याहि नव्हत्या काळजात पेटलेली आग विझवावी म्हणून राधिकेला जवळ घेऊन पोटाशी धरायचा मोह त्यांना अनावर झाला. पण राधिकेनं त्याना आतां दाद दिली नाही. तिच्या मनातहि या मोठ्या माणसांचं बोलण सलत होतं. मास्तरांबद्दलचा ह्या लोकांचा अनाठायी राग तिला खुपत होता. आत्याबाईची मर्जी राखायची आतां तिला फिकीरहि वाटत नव्हती !

' कस हुईल देवा ह्या कार्टीचं ! ' शेवंती आक्कानी पुढ्यांतील शेंगाची दुरडी बाजूला सारली आणि फणकाऱ्यानं निघून गेलेल्या भाचीकडे काळजीच्या दृष्टीनं पाहिलं.

' मास्तर बी तसा काय वाईट न्हाई म्हना ! ' शेवंती आक्कांच्या मनांत मास्तराच्याबद्दल किंचित् चांगुलपणाची छटा उमटून गेली. कसं कोण जाणे, त्यांचं मन त्या क्षणाला तरी मास्तरांच्याबद्दल सहानुभूतीनं

विचार करू लागलं आणि त्याचबरोबर वडिलाच्यावर सूड घ्यायचा विचारहि त्यांच्या मनाला चाटून गेला.

'काय बिगडत न्हाई मास्तरला जमीन जमीनजुमला लई नसला म्हून ! चाटून खायची असतीया काय शिरमंती कुनाची ? चांगला तरना ताटा गडी हाई जवान. लिनबी झकास येतंया. चार चांगल्या मानसांत उटबसबी हाई त्येची. आईबा नसला, भाऊ भैनी नसल्या म्हून त्येच काय बी आडायचं न्हाई. भाईरची रागड मानस जोडल्याती त्येन ! ' शेवती आक्कांच मन मास्तरांच्याबद्दल थोडफार निवळत चालल. पण त्याच्या मनात शका आली ' पावनं पै काय म्हनत्याल असल्या मानसाबद्दल ? अशा का धापाच पोरी उराव हाईत्या तवा हयेनी घाई करून त्या मास्तरड्याच्या पदरांत बांदली पोरगी ? काय सांगायचं मग ?'

आणि या शंकेनं ग्रासून जायच्या आधीच स्वतःच्या स्थळाची माहिती त्याच्या डोक्यांत घोळू लागली, 'आपलं मस्त चांगल हुत, चौबाजूनी चार मानसांत उटून दिसण्याजोग ! मग काय झाला त्येचा शेवट ? सार वसलं या न्हवं जितल्या तितंच जाग्याव ! आन् न्हवरा म्हनायचा त्येनं तर सरता सरना असं घरच राज असताना रांडच्या पायात भिकच डोळे लावून चोरीचा धदा सुरू केला. मान वर करायची सुई उरली न्हाई. तोंडांत बोळा कोंबला तवाच गळा बी दाबायचा न्हाई बिचाऱ्यान ? का मला अशी तिष्टत ठिवली असती ह्या घरांत ? मरमर काम करून पोटाची आग भागवायची हयेच न्हव आमच नशीब ? वा म्हनायचा त्योबी आता रागराग करतूया. बरोबरीला आल्याल्या लेकीच्या थोबाडीत मारून चालती हो म्हनाय करीना आतां त्योबी ! '

शेवंती आक्कांचं हुरद पेटून गेल. असल्या पावण्या-पैपेक्षा मास्तर एकटे असले तरी त्यांच्यांत माणुसकी आहे, ते शिकलेले आहेत, शहाणेसुर्ते आहेत, स्वभावान प्रेमळ आहेत, माणसाचे लोभी आहेत आणि शकीच्या न्हवऱ्यापरास शिकल्याती या भावनेनं त्या पुन्हा विचार करूं लागल्या, ' काय न्हाई बिगडत तसं झालं तर ! आपली पोरगी तरी सुकानं चार घास खाईल त्येच्या घरांत ! दादा म्हनत्याती काय बी ! त्यास्नी गप बसवून

एकडाव इच्यारावं तरी मास्तराला. आपून द्यावा हुंडा द्याची ती जमीनच चार बिघ ! ' आणि त्यांची त्यानाच ही कल्पना आवडली. त्या नादांत त्यांनी राधिकेला हाकहि मारली, " पोरी ऽ ऽ हिकडं ये बगू वाईच ! "

" निजलीया वाटत ! का वो ? " राधिकेऐवजी कमळाबाईच शेवंती-आक्कासमोर आली.

" आत्तां हुतीन् निजली कवा ? "

" काम काय त्यें सागा तरी. मी हाई की आता मोकळीच ! निजलीया वाईच, निजू दे. "

" काम तुज्याकडं न्हाई ! तीच पाइजे. बोलीव बरं ! "

" उटवायची निजल्याली ? " राधिकेच अंग थोड गरम झालं होतं म्हणून तिची झोपमोड करू नये या भावनेनं तिला उठवायला कमळाबाईचा जीव घेईना पण त्यामुळं शेवंती आक्का चिडून म्हणाल्या, " बोलीव म्हन-तीया ऐकू यीना व्हय ! "

बिचारी कमळाबाई मुकाटयानं माघारीं फिरली. इतक्यांत राधिकेला शोधीत आलेला झेल्या खुशीत येऊन मोठ्यानं म्हणाला, " मास्तर शाबूत हाईत ग ऽऽ आक्का ऽऽऽ कसली बी काळजी करूं नकोस. "

पण तें ऐकून शेवंती आक्कांच मस्तक पुन्हा भडकलं. रागानं दांत ओठ खात त्यानी झेल्याला शिवी हासडली, " मेल्या ऽ तुला र कुनी सांगितला ह्यो चोंबडेपना ? "

" तू गप बस आत्ये ! मी आक्काला सागतोय् ! " मास्तरांचा विलक्षण लळा लागलेल्या झेल्यानं शेवंती आक्कांच तोंड बंद करायचा प्रयत्न केला. रागाच्या भरात त्यानंहि मर्यादा ओलांडली. त्यामुळं शेवंती आक्कांचं मन मास्तराविषयी पुन्हा पालटलं. दोन्ही हाताची बोटं मोडून झेल्याला शिव्या देत त्या पुटपुटल्या, " थांब, मास्तराबर आतां ही कार्टी नुसती बोलतीया तरी कशी ती बगतीच मी बी ! " आणि राधिकेवरहि जणू सूड उग-वायचा या भावनेनं त्यांच्या मनाला एक कल्पना अकस्मात् चाटून गेली, ' माज्या नशिबांत जें सुक न्हाई त्यें मी हिला तरी भोगून का दीन ? अश्शी चरफडू दे जलमभर माज्या परासबी ! आतां एकांदा रानटयाच बगीना तर नांव बदल म्हनावं ह्याच आत्तीचं ! '

: १९ :

तुफान चक्री वादळ सुरू झालं आहे, सोसाटयाचा वारा सर्वत्र घुमतो आहे, आभाळ भरून आल आहे, विजा कडाडत आहेत आणि अशा अवस्थेत राधिका रानावनातून पळत निघाली आहे. काटयाकुटयांतून जाव लागल्यामुळ पाय रक्तबबाळ झाले असले तरी तिचा पाय धरणीला ठरत नाही इतक्या वेगान ती धावते आहे.

'अगबाई ! ' मुसळधार पाऊस सुरू झाला. वाटेत दुथडी भरून चाललेली नदी आडवी आली ! राधिकेचं अवसान क्षणभर गळाल; पण 'नाही, नाही. काय वाटेल तें झालं तरी गेलच पाहिजे, त्यांची सोडवणूक केलीच पाहिजे ! ' तिनं मनाचा असा निर्धार केला. पावसाच्या माऱ्यान भिजून गेलेल तोंड उजव्या हातान टिपल आणि माथ्यावरचा पदर काढून कमरेला खोचीत तिनं समोरच्या नदीत उडी घातली.

पाण्याला भलताच वेग होता. राधिकेला तो पाण्याचा अमर्याद अवखळपणा कापतां येईना. तिचे हात भेंडाळून गेले. तशात ती एका जगी भोवऱ्यांत सांपडली ! सगळं जग तिच्याभोवती गरगरूं लागलं

' अग आई ग ! ' एक जोराची गटागळी खाऊन राधिका भोवऱ्यांतून निसटायचा प्रयत्न करूं लागली. पायांत लुगडं अडकल. तिची छाती दडपून गेली. काळीज फाटून गेल्याचा तिला भास झाला.

पण न घाबरतां न डगमगतां तिनं त्या अक्राळविक्राळ भोवऱ्यांतूनहि स्वतःची सुटका करून घेतली. तिचा आनद गगनांत मावेना.

एखाद्या पांखराप्रमाणं पंख हलवीत राधिका आभाळांत उंच भराऱ्या घेऊं लागली. पाण्यापेक्षांहि अधिक गतीनं धांवणारं वारं तिला सहज बाजूला सारतां येऊं लागलं. भराभर तिनं एकामागून एक अशीं अनेक गांवं ओलांडलीं. मोठया अधीरतेनं मास्तरांच्या दर्शनासाठीं डोळे तणावून तिनं खालच्या जमिनीवर नजर रोखली.

एका मोठ्या झाडाजवळ मास्तरांना कुणीतरी बांधून घातलं होतं! हातपाय जखडून गेल्यामुळं त्यांची हालचाल होत नव्हती.

'घुईऽऽऽ' राधिकेनं मास्तराच्यावर आभाळांतून झेप घेतली. मास्तर तापान फणफणले होते. त्याच्या घशाला कोरड पडली होती. 'पाणी पाणी' त्यांना बोलवत नव्हतं. आसपास पाण्याचा थेबही नव्हता ! मास्तराचा जीव घोटाळत चालला. 'अगबाई ग ! ' राधिका घाबरली. तिला धीर निघेना. भीतीनं दडपून गेलेल्या छातीवर दोन्ही हात घट्ट आवळून ती किंचाळली !

'पाणी !' मास्तराच्या सुकलेल्या कठांतून हलकासा आवाज आला. राधिकेनं डोळे विस्फारून त्याच्याकडे पाहिल आणि मग दुसऱ्याच क्षणाला पावसान भिजून चिब झालेला पदर दोन्ही हातांनी गच्च धरून तिन तो मास्तरांच्या 'आ' वासलेल्या तोंडावर पिळला. मास्तर एकदम खुशीत येऊन हसले. पण लगेच अचानक दिसेनासेहि झाले. राधिका मोठ्यानं किंचाळली, 'मास्तऽर !'....

"आक्का !" राधिकेच्या शेजारी झोपलेला किसन दचकून जागा झाला. त्यानं राधिकेला गदगदून हालवल

राधिकेच अंग घामान थबथबल होत. ओठ थरथरत होते. हातपाय गार झाले होते. भीतीन तिच तोड पाढर पडल होत.

किसन घाबरला. त्यानं दोन्ही हातानी राधिकेच तोंड धरल आणि पुन्हा हाक मारली, "आक्का, घाबरलीस ?"

राधिकेनं हळूच डोळे उघडले. समोर किसन दिसतांच त्याला मिठी मारून तिनं अधीरतेन विचारल, "मास्तर ! कुठं आहेत मास्तर ?"

"आक्का !" राधिकेचा भांबावून गेलेला चेहरा बघून किसन घाबरला. राधिकेला मिठी मारून त्यान विचारल, "आईला बोलवू ?"

"किसन !" राधिकेनं किसनकडे रोखून पाहिलं, आसपासहि आपली नजर फिरवली आणि मग तिच्या ध्यानांत आलं कीं, आपणाला स्वप्न पडलं होतं !

राधिकेनं सुटकेचा श्वास टाकला. तिला शकुंतलेची आठवण झाली.

किसनला जवळ ओढीत मग ती पुटपुटली, " तू नीज. मला कांही नाही होत. "

" पण तू ओरडलीस कां एकदम? " राधिकेन तोंडावर घेतलेल पाघरूण बाजूला करीत किसनन खुलासा विचारला.

ते स्वप्न होतं हे कळल तरी देखील राधिकेची भीति अजून गेली नव्हती. त्यामुळं विशेष बोलायच्या भानगडीत न पडता ती म्हणाली, " भीति वाटली रे एकदम ! "

" भीति ? कसली ग ? आणि मी इथ जवळ असताना मास्तराना कशाला हाक मारलीस ? "

" काही नाही ! तू नीज. " राधिकेन किसनला दाद लागू दिली नाही. त्यामुळ किसन झोपला होता तो उठून बसला आणि म्हणाला, " मास्तर दोन दिवस रजेवर आहेत ! त्यामुळ फार कंटाळवाण झालय् ! झेल्यासुद्धा दोन दिवस कुठं दिसला नाही. "

" रजेवर आहेत ? का रे ? "

" कुणाला ठाऊक ! "

" आणि झेल्या कुठ गेला ? "

" तेहि ठाऊक नाही. "

" त्याच्या घरी गेला होतास ? "

" हो. पण त्याची आई म्हणाली–"

" काय म्हणाली ? "

" म्हणाली, मास्तराला बर वाटत न्हाई म्हन कार्टबी गेलंय् त्येच्या गावाला ! "

" खरंच ? " मास्तरांना बर नाही हे ऐकून राधिकेच धाब दणाणलं. आपल्याला पडलेल्या स्वप्नांत काही अर्थ आहे की काय या धास्तीनं तिचा जीव खालीवर होऊं लागला. तिला एकदम गुदमरल्यासारख होऊं लागलं.

राधिकेन आपल्या कोरडया ओठांवरून जीभ फिरविली आणि किसनला म्हटल, " झोप आतां. अजून पुष्कळ रात्र आहे "

" मला पण एक मजेदार स्वप्न पडलं आवका ! " किसननं झोपण्या-

ऐवजी राधिकेलाच उठवून बसवायचा प्रयत्न केला आणि तो सरळ सांगू लागला, " मास्तरानी आम्हांला सहलीला नेल होत. तर एका लांबलाबच्या गावाला आम्ही गेलो होतो पख लावलेल्या सुदर पोरी आणि पोर तिथ होती; आम्हाला पाहाताच त्यानी नाचत आणि गात आमचं स्वागत केल आणि काय मजा बघ! मास्तरानी मला विचारल, 'काय खाऊ पाहिजे बोल !' तर मी म्हणालों, 'टोपलीभर चॉकोलेट द्या !' आणि बघतो तर त्या पोरांनी मला त्यांच्या बागेत नेल आणि तिथ सगळी चॉकोलेटची झाड ! झेल्यान तर माकडाप्रमाण इकडून तिकडे म्हणजे या फादीवरून त्या फादीवर उड्या मारीत फन्ना उडवला. आता मी ही मजा मास्तराना सागणार !"

" ह !" राधिकेन नुसत ऐकल्यासारख केल आणि ती झोपली. पण त्यामुळ किमनचा हिरमोड झाला इतकी मजा सागूनहि आक्का न हसल्यामुळ त्याला थोडं वाईट वाटल. तरी पण तोडावर तस न दाखवता काहीतरी आठवल्यासारख करून थोडी उत्सुकता दर्शवीत म्हणाला, " मास्तराची ती वही झेल्याला दिलीस परत ? "

" केव्हांच ! का ?"

' अग, ते मास्तरानी लिहिल होत तरी तो मजकूर त्यांचा नव्हता !'

" मग ?"

" साने गुरुजीच्या धड्यातील एक उतारा होता तो !"

" खर म्हणतोस ?"

" हो ना ! त्या दिवशी मास्तरानी माझी न् झेल्याची चागली चपी केली वही पळवून आणल्याबद्दल ! आम्हाला वाटलं की, मास्तरच नवीन पुस्तक लिहीत आहेत !"

किसनन केलेल्या या खुलाशावर राधिका काहीच बोलली नाही. कसल्या तरी गोड स्वप्नामधून खाड्दिशी जाग यावी आणि मनाला चुटपुट लागावी तसं तिला झाल. ' तू स्वत.वर विश्वास ठेव. ' या त्या वहीवरील शेवटच्या वाक्यावर ती विसबून होती ! त्या सर्व मजकुरावरून धरणीकंप होऊन इकडचं जग तिकडं झालं तरी मास्तरांचा आपणाला फार मोठा आधार आहे या वेड्या आशेवर तिची बरीच भिस्त होती. एवढंच

नव्हे तर घरच्या माणसानी कितीहि विरोध केला तरी हंसतमुखानं समोर येऊन मास्तर आपल्या गळ्यांत निश्चित लग्नमाळ घालणार या भावनेनंच घरांत कुणी कितीहि बडबडलं तरी तिला त्याचं कांहीं वाटत नव्हतं. नवीन पुस्तकाची ती सुरवात नसून अप्रत्यक्ष रीत्या त्यांनी जणू आपणाला तें पत्रच लिहिलं होतं या भोळ्या आशेवर ती विशेष खुशींतहि रहात होती.

पण राधिकेच्या या वेड्या आशेला एकदम सुरुंग लागला. मनांतील आशा आकांक्षांचा एकदम चुराडा होऊन गेला. मधांशीं स्वप्नांत पाहिलं त्याप्रमाणं ओठाशीं आलेलं अमृत एकदम नाहीसं व्हावं तशी आपली आणि मास्तराची कायमची ताटातूट तरी नाही होणार या कल्पनेनं तिच्या अंगाची तगमग सुरू झाली. संतापान किसनकडे पहात तिनं फणकाऱ्यानं अगावरचं पांघरूण तोंडावर ओढून घेतलं; आणि ती बातमी किसनन कां दिली म्हणून त्याच्यावर रागावत ती चिडून पुटपुटली. " मेल्या, हा नसता चोंबडेपणा तुला सांगितला होता कुणी ? कांही अडल होतं हें बडबडला नसतास तर ? "

आणि त्याच क्षणाला आपल्या तोंडावरचं पांघरूण बाजूला करीत झेल्यानं मास्तरांना विचारल, " आणि असं केलं तर ? "

अजून बरीचशी रात्र असताना झेल्यानं गप झोपून रहावं म्हणून मास्तर म्हणाले, " उजाडलं म्हणजे मग बघू ! आता झोप. "

" छट् ! झोप येत नाही. "

" तरी पण प्रयत्न कर नाहीं कशी येत. ? "

" नाहीच येत. मास्तर, खरंच असं करूं या का आपण ? "

" काय म्हणण आहे तुझ ? फिरायला जायचं ह्या वेळीं ? " झेल्याच्या डोक्यांतून केव्हां कोणती शक्कल निघेल याचा नेम नसल्यामुळं मास्तरांना थोडी धास्ती वाटली.

" आजोबा, आत्याबाई आणि आणखी कोण काय वाटेल तें म्हणू देत; अशाच रात्रीच्या वेळेला सगळी सामसूम झोपल्यावर आक्काला अंगणांत यायला सांगू या का ? "

" कशाला ? "

" तुमच्याशीं बोलायला. कुणाला कळणार नाही इतकं हळू बोलायचं ! म्हणजे मग आक्काला पाहिजे तर मी विचारतो. "

" काय ? "

" की तू मास्तरांच्या घरीं चल म्हणून ! ती ऐकेल ! '

' वेडा कुठला ! झोप बघू या. " मास्तर झेल्याच्या कल्पनेवर हंसले. त्यांनी त्याला एक हलकीशी टप्पल मारली आणि पुन्हा म्हटलं, " लहान पोरानी असला विचार करायचा नसतो हं ! "

" पण आक्काच म्हणाली की तुम्हाला भेटायचंय् म्हणून !" झेल्यानं कारण सांगून टाकलं.

" म्हणू दे ! तूं झोप बघू कसा. "

' नाही तर आतां जाऊं या का आपण ? " झेल्या एकदम उठूनच बसला ! मास्तरांनी त्याला चटकन् उठून झोपवीत म्हटलं, " छे ! असं वेळी अवेळी भलतंच ! "

" अं हं ! भलतंच नाही मास्तर· नाही तर आक्काच लग्न लोकांशीं करतील तिचे बाबा ! " झेल्याचा चेहरा आकसून गेला.

" करू देत केलं तर !" मास्तरांनी त्याची समजूत घातली. पण त्याला तें पटलं नाही. तो थोडा चिडून उठला आणि मास्तरांना हलवून म्हणाला, " छट् ! आक्काला ते आवडायचं नाही. तसं म्हणाली होती ती माझ्या-जवळ एकदा ! "

" म्हणू दे रे ! " मास्तरांनी जाणूनबुजून त्या विषयाकडे दुर्लक्ष करायचा प्रयत्न केला. इतक्यांत कुणी तरी दारावर थाप मारली. झेल्या घाबरून मास्तरांना बिलगला. त्याला वाटलं चोरच आले असणार ! मास्तरांनाहि थोडी शंका आली. त्यांनीं झेल्याला धीर देत दाराकडे पाहिलं. आणखी एकदां दारावर थाप मारल्याचा आवाज आला.

" कोण आहे ? " मास्तरांनीं दरडावून प्रश्न केला.

" मी, शिरपा ! " बाहेरून हलकासा आवाज आला. मास्तरांनीं कपाळावर आठ्या चढवीत विचार केला, " कोण बरं असेल ?"

" दार उगडा मास्तर ! " बाहेरून पुन्हा आवाज आला. झेल्यान तो आवाज ओळखला आणि मास्तरांच्या कानांत तो पुटपुटला, " किसनचा बाप आलाय् वाटत ! "

" कशाला ? " मास्तरानीहि झेल्याच्या कानाशी कुजबूज केली त्यांना जबरदस्त शका आली. झेल्या मध्यतरी म्हणाला तसे आपणाला मारायला तर कुणी आलं नसेल ? मास्तर चपापले. कांही न बोलतां ते गप्प राहिले.

पण पुन्हा दारावर थाप वाजली आणि त्या पाठोपाठ " मी हाय ! भिऊ नगा. तुमच्या भेटीला आलूया ! " असा सहानुभूतीचा आवाज आला.

झेल्यानं आणि मास्तरानी एकमेकाकड पाहिल. मास्तर चटकन् उठले. त्यानी दार उघडल काही तरी भलताच प्रसग उद्भवला तर तयारीत असाव म्हणून त्यानी कोपऱ्यातील काठी हातात घेतली.

श्रीपती हळूच आत आला. झेल्याला बघून त्यान विचारल, " तूं कसा हित?"

झेल्यानं भीतभीत त्याच्याकडे पाहिलं आणि तो उठून मास्तराच्याकडे जाऊन त्यांना बिलगला. मास्तरानी झटकन् दार लावल आणि झेल्याला एका हातानं पोटाशी धरीत श्रीपतीला विचारल, " भलत्या वेळी येणं केलत ? "

" आलो आपला असाच. "

" काही विशेष काम ? "

" मास्तर, तुमचो सगळी गोष्ट कळावी म्हन वस्तीवरनं आलो मी. "

श्रीपतीच हे बोलण मास्तरांना उमगल नाही. त्यांनी साशंकतेनंच त्याच्याकडे पाहिलं. तेव्हा तोच म्हणाला, " सोयरिकीच्या दृष्टीनं इच्यारतूया ! तुमास्नी गनगोत न्हाई, जमीनजुमला न्हाई, हे खर हाय ? "

" कारण ? " मास्तरानी मुद्दामच श्रीपतीकडे रोखून पाहिलं.

" पोरगी आमची आपल्या आईपशी म्हटली, करीन तर मास्तराबरच लगीन करीन ! "

" पण मी तस कधीच म्हटल नाही. " मास्तरानी स्वतःची बाजू सावरली.

" न्हवं मला बी मस्त वाटतंया तसं वो ! पर आमचं दादानी फाटा

ग्रातलंया ! ! त्ये म्हनत्यात तवाच म्या चौकशी केली. त्येंचं म्हनन असल्या फडीफटींग्याला नग द्याला पोरगी ! आन् आमच्या बापजल्मी बायकानीं लग्न ठरविल न्हाईती न् ही कोन आपल आपून जमीवनारी ? मी काय मेलू न्हाई अजून ! आता काय बोलायच सागा ! ”

“ हा प्रश्न तुमचा आहे.” मास्तरानीं एका वाक्यात उत्तर दिल. क्षणभर ते गप्प राहिले; पण मग त्यानीं थोड्या रागानंच श्रीपतीकडे रोखून पहात विचारलं, “ तुमच्या लेकीला पळवून न्यायला मी आलो होतो, हा शोध कुणी लावला तुमच्या घरात ? इतका काही मूर्ख नाही मी ! ”

“ त्यास्नीच वाटल तस ! मी मस्त म्हटलों, तस न्हाई, पर ऐकतंया कोन? आक्कान तर थोबाड रगीवल माज ! ”

“ आणि तरीहि तुम्ही गप्प राहिलात ? ”

“ दादाच्या पुढ काय चलित न्हाई कुनाचं मास्तर ! ”

“ म्हणून दुसऱ्याबद्दल वाटेल ते बोलणे चांगल नाही ! सहज मी एका मित्राच्या घरी त्याला बर आहे का म्हणून चौकशीला गेलो आणि तिथून येऊन शाळेकडे झोपायला निघालो होतो, तर ध्यानी मनी नसताना तुमचा हा भलता आरोप ! आणि तुमचा खुद्द जांवई मात्र बेशक चोर म्हणून घरांत शिरतो याच तुमच्या दादांना काहीच वाटत नाही ! ! ” मास्त- रांनीही श्रीपतीपुढ आपला राग ओकून टाकला.

त्या दोघाच हे बोलण ऐकून झेल्या अंग चोरून एका कोपऱ्यात बसला तें बघून मास्तर म्हणाले, “ तू का घाबरतोस ? ”

“ मला. .माझ्यावर तर ह्याचे दादा भयकर सतापलेत ! म्हणाले, ह्या काटर्यानच मास्तराला नादीवली आमची पोरगी ! ” झेल्यान मास्तरान आपली बाजू उघडी करून सांगितली. त्यामुळ मास्तर पुन्हा गभीर होत म्हणाले, “ तुमच्या लेकीला खुद्द विचारलत तुम्ही माझं पत्र किवा निरोप आला आहे का तसा म्हणून? उगीच गांवभर बडबडत सुटायचं म्हणजे ? ”

श्रीपती मुलीचा बाप होता. एकुलत्या एका लेकीला सुखाची जाग मिळावी म्हणून रात्रंदिवस त्याची धडपड चालली होती. खर म्हणजे एकां तांत जाऊन मास्तरांना मागणी घालीत ‘ पोरगी पदरात घ्या ! ’ अस

सांगायच्या धिटाईन तो चारपांच मैल अंतर तोडून त्याच्याकडे धांवत आला होता. पण मास्तर चिडलेले बघून त्याला धीर होईना. शक्य तितका शांतपणा धारण करीत त्यानं खाली मान घातली आणि एवढंच म्हटलं, " आतड्याला लाज नसतीया मास्तर ! दादांच्या वरच्या रागानं माजा मातूर हिरमोड करूं नगासा चुकी पदरांत घेतों पाइजे तर मी ! "



## : २० :

" कोन, मास्तर ? आन् हिकडं कुनीकड वो आज ? बदली कराय निगालायसा जनू सांगलीला ? " मिरजेचा फलाट सोडून सांगलीची गाडी शिटी वाजवीत निघाली तेव्हा घाईघाईनं डब्यांत घुसलेल्या विठोबाला विश्वासराव मास्तराना बघून विलक्षण आश्चर्य वाटलं ! मोठ्या उत्सुकतेनं मास्तरांच्या खाद्यावर हात ठेवून त्यान आपल्या फेट्याचा शेमला मागं सारला आणि मास्तरांना पुन्हा विचारलं, " खरच, बदली हुतीया का काय तुमची मास्तर ? "

" बदली ? काही कारण नाही दिसत का ?" विठोबान एकदम बदलीसबधीच का प्रश्न काढावा याचा मास्तरांना उलगडा झाला नाही. त्यामुळं त्यांनी कांहीशा प्रश्नार्थक नजरेन विठोबाकडे पाहिल

" का म्हन आमास्नीच इच्यारता व्हय ? अवो, आमचा सासरा तुमच्या बदलीच्या खटपटींत हाय म्हन ऐकलं म्यां ! आन तुमच्या हेडमास्तराच तर त्येन न्हाई न्हाई त्ये सागून लई कान भरल्यात म्हन ? " मास्तरांच्या शेजारी बसत खिडकीच्या गजाला धरीत विठोबान तोंडातील पानतंबाखूचा गोळा थुकून टाकला. त्याला कळल होतं ते सरळ त्यानं मास्तराना सांगून टाकलं आणि खरखोटं कळून घ्यायची इच्छाहि दर्शविली. पण मास्तरांनीं तितक्या मोकळ्या मनानं त्याला उत्तर दिलं नाहीं. कांहीं तरी बोलायचं म्हणून ते उसनं हंसू आणीत म्हणाले, " जाऊं द्या हो ! नोकरी करायची तर बदली ही व्हायचीच आज ना उद्यां. "

पण त्यावर गंभीर होऊन विठोबा म्हणाला, " पण ती सरळपणानं झाल्याली चागली. पोरगी पळवून न्ह्याचा आळ घेतलाय् न्हव त्या म्हाताऱ्यान तुमच्यावर ? "

विठोबान सांगितलं होतं ते खर होतं, तरी पण ते ऐकल्यानंतर मास्तराना थोडा धक्का बसला. विठोबासारख्यान त्यांना या बाबतीत हिणवावं ही गोष्ट त्याच्या मनाला झोबली आणि त्यामुळच थोडचा बेफिकिरीन त्यांनी सागून टाकलं, " म्हातारा काय वाटेल ते म्हणेल ! आपण थोडीच भीक घालायची अशा गोष्टीला ? "

" मास्तर, पोरगी तुमच्यासाठी झुरतीया हें तर खरं ? म्हातारा तसा चागला धोरणी हाय ! "

राधिकेचा असा उल्लेख होताच एकदम काय बोलावं हें मास्तरांना सुचेना. उगाचच आपल्या कोटाच्या खिशात हात घालून बाहेर काढीत आणि रुमालान कपाळ पुसल्यासारखं करीत ते म्हणाले, " मी त्याच्या घरीं थोडाच जातो ह्या चौकशा करायला ? "

" अवो, तुमी कशाला पाइजे राव खुद जायाला ? कार्टी हायती की रग्गड तुमच्या हाताखाली ! पर मास्तर, ते कायबी असलं तरी मी त्या पोरटीला माजी सून करनार ! " मिशावर पीळ देत विठोबान शेवटी आक्काच्यावर सूड उगवायची मनातील कल्पना सागून टाकली. पण ती ऐकताना मास्तराच्या काळजाला जोराचा हादरा बसला. मुलगा नसताना हा गृहस्थ सून म्हणून तिला घरी आणणार कसा ? मास्तराच्या विचारशक्तीला जोराचा ताण बसला आणि त्याच क्षणाला एक शका त्याच्या मनात डोकावून गेली, ' आपला डाव साधण्यासाठी हा पळवून तर नेणार नाही राधिकेला ? ' आणि म्हणूनच एकदम कसला तरी निर्धार व्यक्त करीत ते बोलून गेले, " छे ! ते शक्य नाही ! " इतक्यात विठोबा बसला होता तो उठला आणि मास्तराच्या समोर येऊन उभा रहात म्हणाला, " मास्तर, इटू म्हणत्याती मला ! बोलीन तें करीत असतो मी ! नुसत्या कोरडचा बाता न्हाई मारीत ! तुमच्या जागी असतों तर ह्येच्या मागच तिच्याबर लगीन लावून मोकळा झालों असतों ! तुमी नुसती बुकं वाचा-

वीत ! तुमच काम न्हवं हयें ! लई अवघड ! " आणि एवढ्या मोठ्यादा हसला की, काय झाल तें कळावं ह्या हेतूनं डब्यातील सगळ्या माणसाच्या नजरा, विजेच बटन दाबून दहा वीस दिवे एकदम लावावेत तशा एकदम विठोबाकडे वळल्या. त्यामुळ मास्तराच्या डोक्याला झिणझिण्या आल्या. ते कमालीचे अस्वस्थ झाले. उद्दाम विठोबाच्या थोबाडीत लगवायचा मोह मोठ्या मुष्किलीनच त्यानी टाळला. तरी पण विठोबाकडे रोखून पहात त्यानी सागून टाकल, " तुम्ही मला अजून ओळखल नाहीत ! "

" व्हय व्हय ! खरं हाय ! शाळामास्तर करून करून काय करील लई झाल तर ? सायेबाकडं जाऊन बदली ! ह्येच्या परास त्येला काय जमतया लई ?" विठोबान बिकट हास्य केल. पुन्हा डब्यातील मडळीच्या नजरा या दोघांच्याकडे वळल्या. मास्तर सतापानं लाल झाले. फाड्दिशी कांही तरी उत्तर द्याव म्हणून त्याची जीभ हलली, इतक्यांत वानलेसवाडीच स्टेशन आल्यामुळ विठोबा रामराम ठोकून झटपट खाली उतरला. मास्तराना वाटल पुन्हा तो वर येईल आणि मग आपण त्याला चागल सुनावू, की माणूस परिस्थितीन गरीब असला तरी त्याचहि अत करण शाबूत असत. मनात येईल ते करायची कुवत त्याच्याजवळहि अमू शकते, अब्रूनं दिवस काढायचे त्यालाहि माहीत असतात ! पण चार दोन मिनिटांत गाडी हलली आणि विठोबा माघारी न फिरता तसाच दवाखान्याच्या मार्गान पुढ निघून गेला.

" कोण हो माणूस तो ? " गाडी सुरू झाल्यावर डब्यांतील एका माणसानं मास्तरांच्याजवळ येत विशेष आस्थेन चौकशी केली मास्तरांनीं त्या माणसाकडे नजर टाकली आणि म्हटल, " का ? कशाला पाहिजे ?"

"नाही म्हटल, तुम्हाला एवढ रुबाबात बोलत होता; तेव्हां हा आहे तरी कोण हे कळाव एवढ्याच हेतून सहज विचारल मी. "

"अस्सं! एका मोठ्या जमीनदाराचा जावई आहे तो. " मास्तरांनीं थोडक्यांत माहिती पुरवली तेव्हा तो माणूस कांहीतरी आठवल्यासारखं करीत पुन्हा म्हणाला, " ह्यानं बायकोला टाकलीय्, नाहीं का ? "

त्या माणसाचा हा प्रश्न ऐकून मास्तर चपापले. थोड्या संशयित नज-

रेनंच त्यांनीं त्याच्याकडे पाहिलं आणि आपल्याला त्यातलं कांहीं माहीत नाही असं सांगायच्या उद्देशानं दोन्ही कानावर हात ठेवले. पण तो माणूस थोडा वस्ताद होता. त्यानं मास्तराची उत्तर द्यायची टाळाटाळ ओळखून जाणूनबुजूनच पुन्हा म्हटलं, "आणि तुम्हांला ज्या मुलीबरोबर लग्न करायचं आहे तिलाच हा आपली सून करणार नाही का आपल्या रखेलीच्या पोराबरोबर तिचं लग्न लावून ? "

" म्हणजे ? " मास्तरांना त्या माणसाच्या या बोलण्याचं मोठं नवल वाटलं. ते त्याच्याकडे पहातच राहिले. एवढी बातमी माहीत असणारा हा आहे तरी कोण ?

" खर ना मी म्हणालों तें ? " त्या माणसान हसत हसत मास्तरांना पुन्हा प्रश्न केला आणि आणखी विशेष न बोलतां त्यानं खिडकीतून मान बाहेर काढली.

" तुम्हाला कस हे माहीत?" मास्तरानी त्या माणसाला हातान डिवचलं. त्यामुळ आपली मान खिडकीतून आत घेत तो म्हणाला, "अहो,कळल आपलं असच! तुम्ही मात्र सावध असा म्हणजे झाल. भारी वाड आणि लुच्चा माणूस! मी त्याच्याबद्दल ऐकल होत पण त्याला कधी पाहिला नव्हता; पण त्याच्या बोलण्यावरून ताडल मी. "

आपल्या विवाहाची अशा तऱ्हेन प्रसिद्धी होन चाललेली बघून मास्तराचं डोक भडकू लागल. एरव्ही शात आणि सरळ असणाऱ्या त्याच्या मनाला एकदम निराळी कलाटणी मिळाली. खालचा ओठ दाताखालीं गच्च आवळून धरीत त्यानी कसला तरी निर्णय मनाशी ठरवून टाकला. इतक्यांत 'विश्राम बाग' स्टेशन आल्यामुळ गाडी थाबली आणि का कुणास ठाऊक, सागलीला जायच असताना देखील मास्तरानी चटकन् आपलं पाऊल विश्रामवागच्या फलाटावर टेकवल.....

आणि अगदी त्याच क्षणाला दरवाजाच्या चार पाच पायऱ्या चढून वर येत आजोबा कुणाला तरी म्हणाले, " आतां ह्यो मास्तर आमच्या गांवात कसा ऱ्हातूया बगतो. चार दिवसात बदली झालीच म्हन समजा त्येची ! "

शेवंतीच्या फुलांचा रुमाल विणीत बसलेल्या राधिकेनं तें ऐकलं. तिला धक्का बसला. भरभर डाव्या हाताच्या बोटाला गुडाळलेला दोरा उलगडून तें बोट रिकाम करीत ती खिडकीत आली. तिन वाकून पाहिल.आजोबा शेवंती आक्काना ही बातमी खुशीत येऊन सागत होते. राधिकेनं शेवंती आक्काच्याकडे पाहिलं. तिला वाटलं, नेहमी आपली बाजू घेणारी आपली आत्याबाई या वेळीहि म्हणेल, ' कशाला बिचाऱ्याची बदली करता ?आपल्याला त्येंचा काय तरास हाय ?' पण तसं कांही घडलं नाही. उलट शेवंती आक्का हंसल्या आणि त्यांनीं माडीकडे मान वळविली. त्यामुळ राधिका खिडकीतून बाजूला झाली आणि पुटपुटली, ' माझ्या नशिबात काय काय लिहिलय् कुणाला माहीत ! मास्तर थोडे जोरदार असते तर ह्याची ही मिजास कशाला चालली असती ? थाब. आता भेट् देत म्हणजे सांगून टाकते की, अगदी गरिबीत रहायची माझी तयारी आहे. तुम्ही मला घेऊन चला.'

इतक्यांत शेवती आक्कांचा खालून आवाज आला, " सागलीच्या आबाजी पाटलाचा शिवबा बेस हाय पोरीला ! जाऊन या तुमी. शबूद काडून तरी बगा. जमीन जुमला रग्गड हाय आन् दोन पोरं. लेकवाळ बी न्हाई. आनिक दोन बुक का हुईना शिकलाय म्हनत्याती त्यो ! पैलवानकी तर एका नंबरची हाय म्हन न्हव ? "

राधिका पुन्हा खिडकीशी आली. नव्या स्थळाच्या या बातमीनं तिच्या मनाला दुसरा धक्का बसला काय वाटेल ते करून आता तिचं लग्न झटपट उरकून टाकायला आजोबा उतावीळ झाले होते आणि म्हणून आपल्या वडिलाच्याजवळ गळ घालून तिन त्याना मास्तराना भेटायला सागितलं होत. पण त्यावर मास्तर काय म्हणाले याची माहिती तिला कळली नव्हती. वडील कांही फारसं बोलले नव्हते आणि झेल्याहि आला नव्हता ! त्यामुळं आधीच रुखरुख लागलेल्या तिच्या मनाला या नव्या बातम्यांनी पोखरल्यासारख केलं. आजोबा आणि शेवती आक्का एक झाले की, एकाद्या रानगटाशी नक्की गांठ पडणार या धास्तीनं तिचा जीव खालीवर होऊं लागला. अशा वेळी शकुंतला जवळ होती याची तिला फार जाणीव झाली. बोलतां येत असूनहि मुक्या जनावराप्रमाणं तिची अवस्था झाली. घराण्याच्या जुन्या

वळणासाठी, इभ्रतीसाठी आपला बळी दिला जाणार याची कल्पना असूनहि त्या दोघांच्या तिखट स्वभावाला भिऊन राधिका त्यांना काही बोलू शकली नाही. दोन्ही हातानी आपलं मस्तक गच्च दाबून धरीत ती स्वतःवरच चिडून पुटपुटली, 'देवानं आपल्याला जन्माला घातलं नसत तर काही बिघडल असत ? ह्या अडाणी माणसाच्या या विचारसरणीत असा जीव गुदमरण्यापेक्षा जगाला कायमचा रामराम ठोकलेला काय वाईट ? इकडचा सूर्य एक वेळ तिकडे उगवेल; पण ही माणस बदलायची नाहीत ! श्रीमतीला काय उरावर घेऊन नाचायचं आहे ?' पण त्याच वेळी आजोबा शेवती-आक्काना म्हटल्याच तिनं ऐकल, "त्येचं बगूया मग. ह्यो मास्तर वाटतन बाजूला हूं दे. साऱ्या गावभर ही गोष्ट झालीया मजी ! आमी अब्रूचीं मानस. पर ह्या कार्टीच्या पायात खाली बगायची येळ आली. माजी पोरगी असती तर जित्ती जाळून टाकली असती !"

आता मात्र राधिकेचा तोल सुटला. खिडकीत येऊन ती मोठ्यान ओरडून म्हणाली, "चोवीस तास घरात मला डाबून ठेवून वर ही भाषा काढताना काही वाटायला पाहिजे !" आणि धावत खाली येऊन आजोबांसमोर उभी रहात म्हणाली, "आत्ताच्या आत्तां मला मारून टाका. म्हणजे तुम्हीहि सुटलांत आणि मीहि सुटले !"



## : २१ :

"तुझी माझी प्रीत एकदां तरी घड्ल्..घड्ल्..घड्ल्.."

गावातील हॉटेलमध्यें लावलेली ध्वनिमुद्रिका अगदी उजाडतच राधिकेच्या कानावर आली. नेहमींपेक्षां मोठ्या आवाजाचा कर्णा हॉटेलमध्यें लावला असावा अशी तिची खात्री पटली. त्या गाण्यांतील शब्दन् शब्द तिला स्पष्ट ऐकू येत होता. तिनं लक्षपूर्वक तें गाणं ऐकलं. तिला त्या वेळीं काय वाटलं कुणास ठाऊक; पण ती खुदकन् हंसली. कालचा

सारा दिवस आणि रात्र अस्वस्थतेंत गेली असतांना देखील तिला थोडी हुषारी वाटली. त्या नादातच त्या गाण्यांतील पहिली ओळ स्वतःशीं गुणगुणत ती माडीवरून खाली आली आणि पुटपुटली, ' ह्या गाण्यांतील ही कल्पना आपल्याहि आयुष्यांत खरी झाल्याशिवाय रहाणार नाही. होय, एकदा तरी मास्तर निश्चित भेटतील. कोणत्याहि परिस्थितीत त्याची भेट, झाल्याशिवाय रहायची नाही. '

इतक्यांत किसन तिच्याजवळ येत म्हणाला, " आत्याबाईच्या गावचा माणूस सागावा घेऊन आलायं ! " आणि त्यानं हातानं खूण करीत तो अंगणात असल्याची बातमी दिली.

" सांग जा आत्याबाईला ! " राधिकेन किसनला हें सडेतोड उत्तर दिलं आणि ती सैपाकघरात शिरली. पण त्याच क्षणाला शेवती आक्का फणकाऱ्यानं तिच्या शेजारून बाहेर आल्या. राधिकेन रोखून त्यांच्याकडे पाहिलं आणि चुलीवर चहाचं पातेलं ठेवावं म्हणून झपाट्यान पुढं झाली.

" कुणी तरी तुझ्या गावच आलयं !" किसनन शेवती आक्काना निरोप सांगितला.

" माज्या गांवच ?" शेवती आक्काना आश्चर्य वाटल. " कोन रं ? आन् काय म्हनतूया ?" आश्चर्यानं तोंडात बोट घालीत त्या माजघरातून सोप्यात आल्या

अगणात एक पोरगेलासा माणूस उभा होता. शेवती आक्का समोर आलेल्या दिसताच नमस्कार करून त्यान सांगितल, " इटूबा पाटलांनी सांगावा दिलाया तुमास्नी !"

नवऱ्याच नांव ऐकायला मिळतांच शेवती आक्का दचकल्या. त्यांनीं आजूबाजूला कुणी आहे की काय याची चाहूल घेतली. आजोबा कुठं तरी बाहेर गेले होते हें समजतांच त्यांच्या जिवांत जीव आला. निरोप जाणून घेण्याच्या उत्सुकतेन त्यांनीं त्या माणसाला विचारलं, "काय सांगावा हाय रं बाबा ?"

डोक्यावरचा फेटा चाचपून पहात तो माणूस म्हणाला, " पाटील म्हट-

ल्याती की, तुमची भाची आपली सून हुयालाच पाहिजे ! तवा तशी खटपट करा म्हनूनशान ! "

" काय ? " शेवंतीआक्काच्या काळजांत धस्स झालं भीतीन त्यांची छाती दडपून गेली. डोळ्यापुढं काजवे चमकूं लागले. सर्वांगाला थरकांप सुटला. विठोबान भलताच निरोप धाडला होता. रखेलीच्या पोराबरोबर राधिकेचं लग्न लावायचा आपला मानस त्यान शेवंतीआक्कांच्या कानावर घातला होता.

" न्हाई, न्हाई ! तसं हुयाच न्हाई ! " भीत भीत त्या माणसाला शेवंती-आक्कानी आपल उत्तर दिलं आणि त्या झटकन् घरात निघून गेल्या. एव-ढ्यांत आजोबा बाहेरून आले. त्या माणसाला अंगणांत उभा असलेला बघून त्यांनी कपाळावर आठ्या चढवीत विचारलं, " कोन र तू ? "

" सागावा घेऊन आलूया इटूबा पाटलाचा ! " त्या माणसानं वाकून मुजरा करीत खर होतं ते सांगून टाकलं. त्यामुळं आजोबा एकदम भडकले—
" कुनाला आनलाय् सागावा ? आन् घरात कुनाला इच्यारून शिरलास ? "

आजोबाच्या या रागानं त्या माणसाची तिरपीट उडून गेली. काय बोलाव हे त्याला सुचेना तो इतका घाबरून गेला की, पाठीमागच्या भितीचा आधार घेत एकेक पाऊल टाकीत त्यानं दरवाजाकडील रस्ता सुधारला.

" निगालास कुट ? कसला सांगावा ? " आजोबांनी त्याचा कान धरून पिरगाळला, तेव्हा 'मेलो, मेलों' करीत त्यानं कस बसं सर्व सांगून टाकल.

जावयाचा हा सांगावा ऐकताच आजोबाचे डोळे सतापान लाल झाले. त्यांच्या तळपायाची आग मस्तकाला जाऊन भिडली. विठोबानं आपला हा अपमान करायचा, आपल्यावर सूड उगवायचा भलता डाव रचला अस-ल्याची त्यांना शंका आली. तिरस्कारानं त्या माणसाकडे पहात ते ओरडले, " चालता हो ! " आणि हातपाय आपटीत त्यांनीं घरांत येत शेवंती-आक्कांना विचारलं " काय म्हनतूया न्हवरा ? "

आजोबांचा आवाज कानावर येतांच राधिका एवढ्या मोठ्यांदा दच-

कली की, तिनं चुलीवरून नुकतंच उचललेलं चहाचं पातेल तिच्या हातून निसटलं. शेजारी उभी असलेली कमळाबाई चित्रातल्या भावलीसारखी, ही काय भानगड आहे म्हणून डोळ्यावरील पापणी देखील लवू न देतां टक लावून सासऱ्याकडे बघू लागली आणि शेवतीआक्काच्या अगाच तर पाणी पाणी झालं. खाली मान घालून त्या गप्प उभ्या राहिल्या. त्यामुळं आजोबांचा आवाज आणखी वाढला, "तुला त्येचा सांगावा आलाच कसा ? आन माज्या नातीच लगीन ठरविनारा ह्यो कोन लेकाचा ? तुजंबी अंग असलं पाइजे त्येला ! "

"दादा ! " शेवंती आक्कांना हा त्याच्यावर वडिलानी घेतलेला भलता आळ सहन झाला नाही. डोळे विस्फारीत त्यानी वडिलाच्या वर आपली नजर रोखली, तेव्हा आपल्या मिशावर पीळ देत आजोबा आणखी एकदा गरजले, " त्यो कितीबी धाक दावू दे ! ह्यो फाकड्या कशाला बी भ्याचा न्हाई ! उद्याच्या उद्या त्या सागलीच्या आबाजी पाटलाच्या शिवबासग हिच लगीन ठरवून येतों. कसा येतूया बगतों तुजा न्हवरा आन् तू बी कशी आडवी येतीयास त्येबी बगू दे मला. सागावा येतूया काय त्येचा तुला ? जित्ती उबऱ्यात पुरून टाकीन ! काय समजलीस ? " आणि रागारागान बाहेर निघून गेले.

राधिकेनं आजोबाना उलट उत्तर केल्याच्या कालच्या रागात आणखी भर पडली. धुमसणाऱ्या आगीन जणू एकदम ज्वालामुखीसारखा पेट घेतला. घराण्याच्या इभ्रतीनं आपलं जुनं वळण, जुना नावलौकिक पणाला लावायचा इर्ष्येचा विडा त्यांनी उचलला.

" काय र हृये नशीबा ? " शेवती आक्कांनीं ताडताड आपल्या थोबा-डीत मारून घ्यायला सुरवात केली. विठोबा काय करील त्याचा नेम नव्हता या धास्तीन त्यांच्या काळजान ठाव सोडला ?

" हृयें काय वो दिवाणसाब ! " कमळाबाई लगबगीनं पुढ झाली आणि तिनं शेवंती आक्कांचे हात धरले. पण शेवंती आक्कांनीं तिचे हात बाजूला झिडकारून दिले आणि दांत ओठ खात हाताचीं बोटें मोडीत त्या म्हणाल्या, " ह्या कार्टीच्या पायांत नशीबाचा फेरा देव कसा फिरीवतूया कुनाला

दकल गऽऽ बाईऽऽऽ" त्यामुळं कमळाबाईन आजवर जाणून बुजून दांतखिळी बसविलेल आपल तोंड उघडल. तिला आपला सताप आवरला नाहीं, " तुमी आपल्या बाच खातायसा, तशीच तीबी आपल्या बाचच खातीया ! माज्या पोरीव दातव्हट खाशीला तर सागितल न्हाई म्हनचीला ! वानीवानची एकुलती एक हाय, तर ही तरा तुमची ! वाटव पडल्याली जतान कराय आनलीया व्हय तवा ही भाषा ? "

पण त्याचा परिणाम चागला झाला नाही. आधीच राधिकेनं बेपर्वाईन उत्तर दिल म्हणून भडकून गेलेल शेवती आक्काच डोकं कमळाबाईच्या या अनपेक्षित बडबडीनं आणखीनच तापल सतापाच्या भरात आपल्याच झिज्या उपटायचा आव आणीत त्या भावजयीवर ओरडल्या, " तुजी लेक आनिक तू दोगीबी काळं करा माज्या म्होरन. नाव नग तुमच ! "

" का म्हन काळ करा ? तुमच्यावानी बाच्या घरच खात न्हाई मी ! माज्या घरात हाय मी म्हटल दिवानसाब ! " कमळाबाईनहि उत्तराला प्रत्युत्तर दिल आणि तिन राधिकेला पोटाशी कवटाळून धरली शेवती-आक्काच त्यामुळ पित्त खवळलं. घराण्याच्या इभ्रतीसाठी उभा जन्म भावाचा ससार करण्यात घालवून भावजयीन खाण्यापिण्याची भाषा काढावी याचा त्यांना विलक्षण सताप आला. जवळ पडलेल लाटण उचलून त्यानी रागाच्या भरांत राधिकेवर फेकण्यासाठी हात उचलला, इतक्यात श्रीपती घरात येत आश्चर्यान थक्क होऊन म्हणाला, " मजी ? मारतीस कुनाला ?"

" कां ? भ्यांबी हाय काय कुनाच ? " शेवती आक्कानी श्रीपतीला पहातांच चपापून माग घेतलेला हात पुन्हा वर उगारला. पण श्रीपतीन चटकन् पुढ होऊन तो तसाच अडवून धरला आणि बहिणीकडे रोखून पहात म्हटलं, " आजपातूर समजून हुतो मी की, सारा ख्योळ न्हवराच करतूया तुजा. पर. . पर तू बी त्येला सामील असचील हयेची दकल आज मिळाली ! खबरदार माज्या पोरीला हात लावशील तर ! न्हाई लगीन झाल तिचं तरी बेहत्तर. पर मी तिला तुजी सून हून देणार न्हाई ! " आणि त्यान शेवंती-आक्कांना तिरस्कारानं बाजूला ढकललं. इतक्यांत झेल्या नेहमीच्या संवयी-प्रमाणं ओरडत घरांत घुसला, " आक्काऽऽऽ मास्तरांचं लग्न ठरलं !

मास्तर लग्न ठरवून आले ! आत्तांच मला त्यानी सांगितलं की आपलं लग्न ठरल म्हणून ! "



## : २२ :

'छे ! तें कस शक्य आहे ? झेल्या म्हणाला ते कधी तरी खरं होईल का? मास्तर असं स्वप्नांत तरी करणं शक्यतेला धरून होईल ? नाही, नाही. झेल्या उगाच कांहीतरी सागत आला.' राधिकेनं मनस्ताप असह्य झाल्यामुळं डाव्या हाताच मनगट दाताखालीं धरलं आणि आपले डोळे घट्ट मिटून धरले. सार आभाळ फाटल असून आपण कुठंतरी एखाद्या खोल दरीत कोसळत असल्याचा तिला भास झाला.

मास्तरांच लग्न ठरल्याची ओझरती बातमी झेल्याकडून समजल्यापासून राधिकेला धरणी ठाव देत नव्हती. शेवतीआक्कांनी क्षणभरहि झेल्याला तिच्याजवळ उभं राहूं न दिल्यामुळ पोटभर चौकशी करण्याच सुखहि तिला उपभोगता आल नव्हत गेले दोन दिवस तोड दाबून बुक्क्याचा मार ती सहन करीत होती. तिच्या सगळ्या भावनाची राखरागोळी होऊन त्या जमीनदोस्त होत चालल्या होत्या. मास्तरांचाही आधार तुटल्यावर जायचं कुठ ? कुणाच्या जिवावर हा त्रास सहन करायचा ? राधिका भांबावून गेली. जबरदस्तीन एखाद्या रानगटाच्या गळ्यांत आजोबा आपल्याला बांधून टाकणार याची तिला खात्री पटत चालली. ते भेसूर चित्र एकसारखं नजरेसमोर येऊन तिला अस्वस्थ करूं लागलं. तिन पोटांत न मावणारं दु:ख अश्रूंच्या रूपाने गालावर ओघळल होत, ते पदरानं टिपून घेतलं आणि मान वर केली. त्या वेळी बराच अंधार पडत चालला होता. तिन्हीसांज टळून दिवेलागण झाली होती. पण तुळशीच्या कट्टयावरून उठून आंत जायची तिला इच्छा होईना. त्या अंधारात सारी रात्र तिथंच बसून, एकटीन आपल्या दु:खावर फुंकर घालायचा मोह तिला अनावर झाला. इत-

क्यांत सैपाकघरांत आजोबांचा आवाज आला, "सागलीच्या आबाजी पाटलाच्या पोरासंग आपल्या पोरीचं लगीन ठरवून आलों. पाच हजार हुंडा आनिक लगीन करून द्याचं ठरल " तें ऐकून राधिकेच्या अगाला कापर भरलं. तिच्या सौभाग्याची रेघ आंखली गेली. तिच्या भावनांना कायमची मुरड बसली. लहानपणापासून शिकलेला नवरा करायच स्वप्न घराण्याच्या इभ्रतीसाठी एका क्षणांत भंग पावलं. कसल्या तरी भयकर कल्पनेच्या भावनेनं तिच्या पोटांत भीतीचा गोळा उठला

इतक्यात कुणातरी अनोळखी माणसाची मिठी राधिकेच्या कमरेभोवती अकस्मात पडली आधीच भीतीन गोठून गेलेली राधिका या अनपेक्षित प्रकारानं किंचाळली; पण तिचा आवाज घरात पोचायच्या आधीच विद्युत्-गतीन तिला कुणीतरी तिथून उचलली. तिला काही समजायच्या आधीच ती घोडयावर पालथी पडली आणि घोड जोरान धावू लागल

गेले दोन दिवस पाळतीवर असलेल्या विठोबान डाव साधला सासऱ्यावर सूड उगवायची त्याची फार दिवसाची इच्छा अचानक सफल झाली राधि-केला आपली सून करून सासऱ्याला कायमचं बदनाम करून टाकायचा त्याचा मोह अशा रीतीन पुरा व्हायला आरभ झाला आनदातिरेकान बेहोष होऊन विठोबान घोडं उधळलं हा हां म्हणता गावची शीव ओलाडून तो पसार झाला

"अगबाई! पोरगी?" परसदाराला राधिकेची किकाळी ऐकून शेवती आक्का धांवल्या खऱ्या; पण तिथ राधिका नसलेली ध्यानात येतांच त्याच्या काळजाला जोराचा हादरा बसला त्यानी साऱ्या घरभर धावपळ केली त्याच्या मागून कमळाबाई धावली. आजोबाहि धावले पण राधिका कुठेच सांपडेना! सर्वांची बोबडी वळून गेली. शेवंती आक्कानी हबरडा फोडला. कमळाबाईन भितीशी टक्कर घेतली आजोबाचे डोळे विस्तारले डोक्यावरचे केस ताठ झाले. पण विचार करीत बसायची ती वेळ नव्हती. हातांत काठी घेऊन ते पाय नेतील तिकडे धावत सुटले. त्याच्यामागून गांवांतील कांही लोकहि पळत निघाले एका क्षणांत साऱ्या गांवभर ही बातमी पसरली. ज्याच्या त्याच्या तोंडीं हाच विषय झाला.

" काय ? माझी पोरगी ?" शेतावरून घरी परतणाऱ्या श्रीपतीच काळीज फाटून गेल. तो सैरावैरा धावत सुटला. त्याच्या तोंडचं पाणी पळाल.

" ह्यो मास्तराचा तर डाव नसल ? " आजोबांना रस्त्यान धावतां धावता शका आली. त्यामुळ त्यानी कोसभर पुढ गेलं असता मागं तोंड फिरवून मास्तराच्या गावाला जायचा निर्णय एकदम घेऊन टाकला. दात ओठ खात त्यानी पैज मारली, "लेकाचा म्होरं दिसू दे तरी मजी न्हाई न्हाई— एवड टुकड करून टाकतो " एवढ्यात एक दूरच्या गांवचा वाटसरू त्या रस्त्यानं जात होता, तो या चार पाच मडळीना धावतांना बघून म्हणाला, "काय भानगड हाय वो ?" पण त्याला समजावून द्यायला कुणालाहि सवड नव्हती. प्रत्येकजण विलक्षण उत्सुकतेनं धांवत होता. काळजीन ज्याच त्याच अंतःकरण करपून जात होत. प्रत्येकाचा डोळा राधिकेला शोधायला उतावीळ झाला होता. आजोबा तर वेड्या पिसाटासारखे पळवत नव्हत तरी तोंडाला फेस येस्तोंवर धांवायचा प्रयत्न करीत होते. त्याच तोंड काळवडून गेल होत.

त्या माणसानं या मडळीच्या धांवपळीचा अदमासान कानोसा घेतला. रस्त्यावर त्यान एक बेफाम वेगानं धावणारा घोडा पाहिला होता. त्याचा. आणि या गडबडीचा काहीतरी सबंध असला पाहिजे या भावनेनं त्या मडळीना थोपवून धराव म्हणून त्याच्यामागून पळत तो ओरडला, " ह्या ह्या वाटेनं एक मानूस घोड्यावन . .व्हय, घोडं चौखूर उधळीत पळाला. त्येच्या पुढ्यात . ."

" काय म्हनतूयास बाबा ? " आजोबाची थकलेली पावलं पळता पळतां थबकली. नजरेनं त्या माणसाचा वेध घेतला. काहीतरी मागमूस लागल्याची समाधानाची रेषा त्यांच्या सुरकुतलेल्या गालावर उमटली.

"हं हं ! एक घंटा दिकून झाला न्हाई एवढ्यांत बघितलं म्यां ! ह्या वाटेनं जावा. " त्या माणसानं प्रसग ओळखून आपल्यालाहि अस्वस्थता वाटत असल्याचा आविर्भाव आणीत हातानं दिशा दाखवली. झाले. एका क्षणांत मास्तरांच्या गांवचा रस्ता सोडून ह्या मंडळींचा मोर्चा त्या दिशेनं वळला. पुन्हा मघाचीच धांदलीची धांवपळ सुरू झाली.

चारी दिशांनी गांवची मंडळी राधिकेच्या शोधासाठी धांवू लागली. त्यांत शेवंती आक्काहि श्रीपतीबरोबर पळत निघाल्या होत्या.

'ह्यो डाव ह्येंचा तर नसल ?' धांवता धावतां शेवती आक्काच्या मस्तकात झिणझिण्या आल्या. आपल्याच नवऱ्यानं सांगाव्याप्रमाणं कांहीं कारस्थान रचून राधिकेला पळवली असण शक्य आहे. याची खात्री मनांत डोकावताच त्यांच्या अगाचं पाणी पाणी झाल. धडधडत्या छातीवर जोरानं आपले दोन्ही हात दाबीत त्या गडी माणसालाहि लाजवतील एवढ्या वेगानं पळत जात घाबऱ्या घाबऱ्या श्रीपतीला उद्देशून ओरडल्या, " लगीन लागायच्या आंत पोरगी घावली पाइजे ! पाखरावानी धावत जा म्होरल्या वाटेनं आमच्या घरला. "....

आणि त्याच क्षणाला ब्रेक दाबून सायकल दाराशी लावीत मास्तरांनी समाधानान शीळ घालून गुणगुणतच घरात प्रवेश केला,

" दोन घडीचा डाव, त्याल। जीवन ऐसे नाव;
मनासारखा मिळे सौगडी, खेळाला मग अवीट गोडी,
दु खाला नच वा ऽ ऽ व ". .

राधिकेशी आपलं लग्न निश्चित होणार या भावनेनं मास्तर या दोन तीन दिवसांत फारच आनदात होते. त्यासाठी आठ दिवसाची रजा काढून त्यानी ससाराला लागणाऱ्या सामानाची जुळवाजुळव करायला आरभ केला होता. सागलीहून दोन नवी पातळ देखील त्यानी तिच्यासाठी आणली होतीं.

काय वाटेंल ते करून, प्रसग येईल त्याप्रमाण जिवावर बेतणार कोणतहि धाडस करून ते राधिकेला पळवून आणायला तयार झाले होते ! त्यासाठीं आपल्या चारदोन गावगुड मित्राना त्यानी सूचनाहि दिली होती. विठोबाच्या मनांत असा कांही भयंकर विचार यायच्या आधीच झेल्याकडून राधिकेला शेतावर नेहमीप्रमाणं पोहायला यायला सांगून तिथून उचलून आणायचा डाव त्यांनी रचला होता. कारण नसताना आजोबानी त्यांच्यावर घेतलेला आळ आतां पुरा करायचा मोह ते आवरूं शकत नव्हते. त्याचं इतक्या दिवसाचं सरळ मार्गानं जाणारं मन राधिकेच्या प्राप्तीसाठी आतां वाटेल तो मार्ग पत्करण्याइतक बंडखोर बनत चाललं होत.

मास्तरांनीं अगदी आनंदान आपल्या टेबलाचा खण उघडला आणि झेल्याच्या करवी निरोप पोचवावा म्हणून त्यांनी राधिकेला पत्र लिहायला सुरवात केली,—

" प्रिय राधिके,

" इतक्या दिवस ज्या क्षणाची तू वाट पहात होतीस तो क्षण आतां आपल्या सुदैवानं जवळ येत चालला आहे. आतां तू कांही झालं तरी माझी होणार ! तुझा म्हातारा आजोबा काय वाटेल ते ठरवू दे. "

पण त्या पत्राच्या या चारदोन ओळी लिहून होतात न होतात इतक्यातच राधिकेच्या घरचा गडी आणि किसन घाबऱ्या घाबऱ्या मास्तराच्या घरांत घुसत म्हणाले, " आक्काला कुणीतरी पळवून नेली ! तुम्ही तर तिला आणली नाही ना ? "

" काय म्हणतोस ? " कल्पना नसतांनाहि एकदम अंगावर विजेचा जोराचा धक्का बसावा त्याप्रमाणं ही बातमी ऐकून मास्तराना हादरा बसला. 'आ' वासून किसनवर नजर रोखीत त्यानी त्याला गदगदून हलवीत पुन्हा पुन्हा विचारल , " हे काय भलतच सागतो आहेस ? "

" अगदी खर आहे ! आक्का कुठ आहे लौकर दाखवा. " भाबावून गेलेल्या किसनचे डोळे ओलसर झाले. त्यान साऱ्या घरभर नजर फिरवीत मास्तराना पुन्हा एकदा तोच प्रश्न केला—" आक्का कुठाय् मास्तर? "

पण त्याला उत्तर देण्याइतपत मास्तर शुद्धीवर राहिले नव्हते. विठोबा सागलीला बोलला होता त्याप्रमाण त्यान काहीतरी भयकर कारस्थान रचलं असल पाहिजे या कल्पनेनं त्यांची छाती दडपून गेली होती. त्याच्या इच्छा आकांक्षा कायमच्या पिचून गेल्या होत्या. एखाद्या वेड्या माणसाप्रमाणं साऱ्या घरभर धांवत त्यानी राधिकेला मोठमोठ्यान हाका मारायला सुरवात केली. इतक्यात भाले बर्चे घेतलेल्या चारसहा लोकानी विजेच्या वेगानं त्याच्या घरात घुसत त्याना दम भरला, " पोरगी कुठाय दाव गुमान. न्हाईतर आमच्याशीं गाठ हाय ! मास्तर मानूस तू ! आन् आडावान्यानी असला धदा करतूस ? थू: तुझ्या जिनगानीवर ! "

❂ ❂ ❂

# : २३ :

" छे छे ! पोरी, अशी रडू नगस. माज्या पोरीवानीच तू बी मला मी जवळ असतांना रडतीस कशापाई ? घाल, घाल त्यो हिरवा चुडा. तुजा तुला भराय् यावा म्हून सैल काकनं आनल्याती घाल, हात भरून घाल. बगू दे एकडाव ह्या डोळ्यान तू चुडा ल्याल्याली ! " रडून रडून घायाळ झालेल्या राधिकेला विठोबान पोटाशी धरली. तिच्या केसावरून मायेन हात फिरवीत त्यान आपल्या परीनं तिची समजूत घालायचा प्रयत्न केला. पण राधिकेला ते मुळीच आवडल नाही. उलट तिला त्याची विलक्षण भीति वाटली. चटकन् त्याच्याजवळून दूर होत तिनं पुढ्यातील हिरव्या रेशमी काकणाची माळ बाजूला सारली आणि म्हटलं, " घरला नेतो म्हणालास आणि इथं जगलात आणलीस ! गोळी घालून मारून तरी टाक एकदाची ! "

" मारून टाकायपाई आनली व्हय तुला ? खुळी तर नव्हस ? माजी सून करतों आन मग खुशाल घरात न्हेतो. " विठोबा मोठ्यादा हसला आणि त्यान राधिकेचा हात खस्‌दिशी पुढ ओढीत त्या माळेतील एक बांगडी तिच्या हाताला लावली. त्याला थाबायला वेळ नव्हता सामऱ्यावर मूड उगवला या नादात ह्या पोरीच्या गळ्यात मगळसूत्र अडकावून टाकायला त्याचा जीव उतावीळ झाला होता. भरकन् राधिकेच्या हातात हिरवा चुडा भरला की, त्या जंगलातल्या एका लाबच्या देवळांत जाऊन तो आपल्या मुलाबरोबर तिच लग्न लावणार होता ! त्यासाठी त्यान मुलाला आणि आपल्या काहीं साथीदारानाहि वेळकाळ ठरवून दिला होता. सगळी तयारी जय्यत झाली होती. पण राधिका लग्नाला सुखासुखी तयार होईना ! तिला त्याचं हें सारं वागण भेसूर वाटत होतं. विचार करायला तिला घटका-भरहि तो फुरसत देत नव्हता. त्यामुळं या घटकेला मरण येईल तर बर या भावनेन तो सागेल त्या गोष्टीला ती चटकन् राजी होत नव्हती. पण जेव्हां विठोबानंच तिला बांगड्या भरायचा प्रयत्न केला, तेव्हां मात्र तिला ती गोष्ट बरी वाटली नाही. पदराच्या टोकानं डोळ्याच पाणी टिपीत भीत

भीत तिनं त्याच्याकड पाहिलं आणि म्हटलं, "माझी मी भरते. तूं मागं हो."

"हां, अशी वाईच सल्ली बोल." विठोबा आनदानं माग सरकला.

राधिकेन ती बांगडयाची माळ सगळी सोडली आणि जोडीनं दोन दोन अशा बांगडया हाताला येतील तशा घेऊन हातांत भरायला आरभ केला. त्यामुळं क्षणभर बाहेर डोकावीत विठोबा म्हणाला, "पैली काकनं फोडून टाक सगळी आनिक नऊ नऊ घाल एकेका हातांत, मजी मागचं म्होरचं सोन्याच डाग खुलून दिसत्याल हाताला!"

त्यावर राधिकेनं आणखी काही वाद घालायला नको म्हणून आपल्या पहिल्या बागडया आधीच घोडयावरून येताना धक्का लागल्यानं पिचल्या होत्या, त्या सरळ वाढवल्या आणि चांगल्या पंधरा हिरव्या बागडया एकेका हातांत भरीत म्हटलं, "झाली आतां तुझ्या जीवाची शाति ?"

इतक्यात कुणीतरी धांवत येत असलेल्या पावलाचा पालापाचोळयांतील आवाज विठोबाच्या कानावर आला. त्याला वाटलं सासराच आला असावा काही सुगावा लागून! आणि म्हणून त्यानं चुटकीसरशी राधिकेला उचलली आणि खाद्यावर टाकीत मागच्या वाटेन तो धावणार, इतक्यात कोणीतरी ओरडल, "इटूबा, घात झाला! पोरग पळिवल आपल तुज्या पावन्यानी!"

"पोरग पळीवल ?' विठोबाच्या काळजाला जबरदस्त धक्का बसला. राधिकेला चटकन् खाली टाकून त्यान त्या माणसाकडे डोळे फाडफाडून पहात विचारल, "काय म्हनतूयास काय ?"

"लौकर चल; न्हाई तर पोराच न्हाई न्हाई एवड टुकड हुतील म्हणत्याती मानस! धावीस जवान गडयानी खडयासारखा उचलला आनिक त्येच्याजवळ भालबर्चेवी हाईत म्हणत्याती." त्या माणसान एकेका शब्दाच्या उच्चाराबरोबर आपल्या शरिराची अशी काही हालचाल केली की, त्यामुळं विठोबा चागलाच चपापला. त्याच्या डोळयासमोर काजवे नाचू लागले आणि क्षणार्धात जेव्हा सतापानं त्याची शीरन् शीर उडू लागली तेव्हां मात्र राधिकेची विचारपूसहि न करतां तो त्या माणसामागून पळत जात ओरडला, "माज्या पोराच्या केसाला तरी धक्का लागू दे मजी सांगतों

येकेकाला नमुना ! पोरगं पळवून न्हेल काय ? डाव साधलासा पर पचायचा नाई म्हनाव ! ”

‘ आता काय वाटेल ते होऊं दे ! हा तर गेला. ’ राधिकेच्या तोंडावर कमालीच समाधान तरळल. विठोबा तिला सोडून गेल्यामुळं तिच्या जिवांत जीव आला. त्या क्षणाला धांवत जाऊन मास्तराच्या गळयाला कायमची मिठी मारायचा मोह् तिला अनावर झाला. पण तिन पुन्हा विचार केला, ‘ मास्तर या धांवपळीत जिवंत तरी असतील ? त्यांना कुणी मारल तर नसेल ? त्याच्यावर भलभलते आळ घेऊन तुरुंगांत डांबलं तर नसेल ना कुणी ?

‘ नाही नाही. माझे मास्तर मला पळवून नेण्याइतके भ्याड नाहीत ! ’ राधिकेनं मनासमोर तरळणारं भेसूर दृश्य डोळयावरून हात फिरवीत बाजूला सारलं आणि ती पुन्हा पुटपुटली, ‘ विठोबाचा मुलगा पळवून नेला ! छान झाल माझ लग्न करत होता ते देवानं चागल बक्षिस दिलं त्याला–’ पण का कोण जाणे त्या क्षणाला तिला इतकी भीति वाटली कीं तिच्या सर्वांगाला थरकांप सुटला. आपल्या वाटेतून विठोबा बाजूला झाला तरी आणखी कुणीतरी आडदाड पुन्हा दत्त म्हणून पुढ यायचा, या धास्तीनं काळ कुत्र देखील भुकलेल ऐकू येन नाही अशा जगलाकडे तिन भीतभीत पाहिल आणि मग काय वाटेल ते होऊ दे, कुठतरी उचच उच डोंगरावर जाऊन खोल दरींत आपल शरीर झोकून द्यायच या कल्पनेन ती एकदम तिथून पळत सुटली.

ऐन उन्हाची वेळ. माथ्यावर ऊन रणरणत होत पायाखाली आग पाखडत होती. भोवतालच जग खायला उठत होत पोटात भीतीचा गोळा उठला होता ओठ तहानले होते. डोळे पाणावले होते. तरी पण काटयाकुटयातून पळतांना वाऱ्यामुळं एखाद्या झुडुपात अडकणार पदराच टोक काढून न घेता पदर तसाच फाटू देत राधिका पुढ धांवत होती. पाय रक्तबंबाळ झाले तरी धरणीला ठरत नव्हते.

आणि अशाच अवस्थेंत तास दीड तास गेला असेल नसेल, इतक्यांत डोळयांत तेल घालून राधिकेला शोधत रानोरान भटकणारे मास्तर सुदै-

वानं त्या वाटेला लागले. वाटेल तिथ त्यांनी स्वतःचा जीव धोक्यात घालूनहि आपली सायकल घातली. रात्रंदिवस त्यानी क्षणभरहि विश्रांति न घेता राधिकेचा शोध चालू ठेवला होता. अखेर फार लाबून कुणीतरी बाई पळत निघाल्याची त्यांना चाहूल लागली. ' हीच तर आपली राधिका नसेल ? ' मास्तरांनी आपल्या कोरड्या ओठावरून जीभ फिरवली आणि मनाला धीर देत सायकलीचा वेग वाढवला.

" राधिके ! " राधिकेच्या जवळ जाताच मास्तरानी आनदून सायकलवरून उडी मारली आणि तिच्यावर झेप घेतली.

" मेले, मेले " राधिका भेदरून किचाळली तिला मास्तर तिथ भेटतील याची पुसटहि कल्पना नव्हती कुणी तरी आडदाडानच पुन्हा आपला डाव साधला या भावनेन ती मास्तराच्या हाताला कडकडून चावा घेत ओरडली, " मला सुखान मरूं देखील द्यायच नाही का ? "

पण मास्तरांनी तिला आपल्या कुशीत घेत तिच्या चावण्यान होणाऱ्या वेदना सहन करीत शातपणान म्हटलं, " राधिके, ओळखल नाहीस?"

" मास्तर ? " राधिकेचा आपल्या डोळ्यावर आणि कानांवर विश्वास बसेना. एखाद स्वप्न पहाव तशी तिची अवस्था झाली भाबावून माग सरकत तिन आपले डोळे तारवटल्यासारखे मास्तराच्यावर रोखले आणि मग तिला एकदम रडू कोसळलं, तेव्हा मास्तरानी तिला आणखी एकदा जवळ घेतली आणि धीर दिला, " मी आलो तुझ्यासाठी आणि तू रडतेस ? ऊठ, मी आहे जवळ. चल, आपण माझ्या घरी जाऊ या " आणि त्यानी आपल्या धोतराच्या सोग्यानं तिचे डोळे पुसले.

" मास्तर ! " राधिकेन मान वर केली तिचा जीव खाली पडला. आनदानं तिचा ऊर भरून आला. घाईघाईनं ती हसत हंसत उठली आणि म्हणाली, " चला; हा हिरवा चुडा कारणी लागू दे. आपण आत्तांच्या आत्ता लग्न करूं. "

" एवढी घाई ? " मास्तर मनापासून हसले. राधिकेच्या निष्पाप प्रेमाचा त्याना मनस्वी आनद झाला. ते टक लावून तिच्याकडे बघू लागले.

राधिकेनं नजर खाली वळवली खरी; पण त्याच क्षणाला तिच्या ध्यानांत आलं की, मास्तराचा उजवा हात रक्तानं माखला आहे !

" अगबाई ! हे काय मास्तर ? " राधिकेच्या छातीत धस्स झालं. त्या विठोबाच्या माणसांनी मास्तरांना इजा केली असावी या कल्पनेनं तिची छाती दडपून गेली.

" घाबरू नकोस अशी राधिके ! मला कुणी कांही केलं नाही.तू– तू मात्र चावलीस ! "

" खरंच ? " राधिकेनं जीभ चावली आणि सगळा प्रकार लक्षात येताच चपापून आपला पदर पुढं करीत ते रक्त टिपायचा प्रयत्न केला. पण मास्तरांनी आपला हात माग घेत म्हटलं, " असू दे. जन्माची आठवण राहील ! "

" नको, नको असली मेली आठवण ! नको मला आतां. नुसती आठवण नको, तुम्ही हवत. तुमची बायको म्हणून मला जगायचय्. चला, इथं कुणी यायच्या आत आपण लग्न करू. नाही तर–" राधिका गंभीर झाली. मास्तरांना चावल्याचा तिला पश्चात्ताप झाला. पण त्याहिपेक्षा त्या घटकेला विवाहबद्ध होऊन कुणी यायच्या आधी मास्तराची बायको म्हणून येणाऱ्या हल्ल्याला तोंड द्यायला ती उतावीळ झाली. तिनं मास्तरांच्या हाताला धरून ओढीत म्हटलं, " तो मेला विठूमामा, ते रागीट आजोबा, ती नागिणी-सारखी आत्याबाई, यापैकी कुणीहि नजरेला पडायच्या आधी तुमच्या नांवचं कुंकू कपाळाला लागू दे मास्तर ! मला आता नाही धीर निघत. "

" आणि तेवढ्यासाठीच तर माझ्या काही मित्रमंडळींनी विठोबाच्या मुलाला अचानक उचलून नेऊन तुझी सुटका केली. "

" खरंच ? "

' होय. तुझ्यासाठी झेल्यानं तर जिवापाड मेहनत घेतली. एवढसं कार्टं, पण रात्रंदिवस भटकत आहे. तुझ्या घरच्या माणसांनी माझ्यावर एकदम हल्ला केला तर तो पुढं झाला ! "

" झेल्या आहेच तसा प्रेमळ. " राधिकेचा ऊर भरून आला. समाधानानं तिच्या डोळ्यात आनंदाश्रू चमकले. हसतमुखानं मास्तरांच्याकडे

तिनं जेव्हा पाहिलं तेव्हां त्यांनी तिच्या नजरेला नजर भिडवीत म्हटलं, " आतां आपणाला फार वेळ इथं नाही थाबता येणार. चटकन् निघायला हवं; नाहोंतर चवताळलेला विठोबा पुन्हा यायचा ! " आणि त्यानी समाधानान आपल्या उजव्या हातातून थेबाथेबान घरंगळणार रक्त तिच्या कपाळावर कुंकवाच्या जागी लावीत पुन्हा म्हटलं, " घे, कुकू हवं ना ? नुसतं कोरडं नाही, तर काळजानं माखलेलं ओल !"

राधिकेच्या पोटांत आनद मावेना. तिच्या तोंडावर आनदातिरेकाचं हसूं फुललं. एवढयात कुणाची तरी चाहूल कानावर आल्यामुळ मास्तर म्हणाले, " आतां सुखाच्या गोष्टी करायला वेळ नाही. तुझे आजोबा भेटले की कदाचित अजूनहि–"

" छे ! आतां ते शक्य नाही ! हिरवा चुडा भरला तुम्ही भेटलात. मनान लग्न लागलं आपल. रक्ताच कुंकू कपाळाला लावलत. मी तुमची सौभाग्यवती झाले. आता मला कोणीहि तुमच्याजवळून दूर नेऊ शकत नाही ! "

राधिकेन मास्तराची शका दूर करायचा प्रयत्न केला खरा, पण कोणत्या घडीला काय घडेल याचा नेम नव्हता, अशी सगळीकडून तग परिस्थिति असल्यानं मास्तरांनी तिथून धावत जाव म्हणून तिचा हात धरायला पुढं केलेला हात आपल्या हातानं घट्ट धरीत ती जातां जाता एवढच पुटपुटली, " आतां मी भीत नाही आणि माझ्यासारख्या तुमच्या नववधूला कुणाची हात लावायचीहि छाती नाही. माझी खात्री आहे आता आपल्या वाटेत आजोबाहि यायचे नाहीत ! त्यांना उलट आनंद वाटेल. "

त्यावर मास्तरहि एवढ म्हणाले, " कुणाला ठाऊक पुढयात काय वाढून ठेवलंय् ? तू भेटलीस, मला सगळं मिळालं. आतां प्रत्यक्ष आपलं लग्न नाहीं झालं तरी मला पर्वा नाही. "



# : २४ :

" ह्री तुमची मुलगी. सांभाळा आतां नीट मी जातों." राधिकेच्या इच्छे-विरुद्धच मास्तरांनी तिला तिच्या घरांत आणून सोडली आणि आजोबांना असं सागून ते चटकन् माघारी वळले.

" पोरी, आलीस? " आजोबांनी भाबावलेल्या नजरेन धावत पुढ होऊन राधिकेला पोटाशी कवटाळली आणि कमालीच्या कृतज्ञतेने मास्तरांकडे पहात ते पुन्हा म्हणाले, " थाबा मास्तर, निगालासा कुटं ह्रिला सोडून?"

" आजोबा " मास्तर आणि राधिका दोघेहि एकदम चपापले. दोघानाहि त्याची भीति वाटली. पण आजोबांचा आनंद गगनांत मावत नव्हता सोन्या-सारखी पोरगी घरांत परत आली या भावनेने त्यांचा ऊर भरून आला होता दाही दिशा वणवण फिरून देखील त्यांना जे साधलं नव्हत तें मास्त-रानी केलं या भावनेन त्यांच्या मनातील मास्तराच्याबद्दलची अढी एकदम बाजूला झाली आणि त्या नादातच हात धरून मास्तरांना जवळ घेत त्यांनी मोठ्यानं घरांत हांक दिली, " शेवंते ऽऽऽ पोरगी आन् जावाय दोगबी आल्याती ! भाईर ये लौकर. "

" काय म्हटलामा ?" कमळाबाई आणि शेवंती आक्का दोघीही एकदम वाहेर धावल्या. विठोबाच्या पोराशीच आपल्या पोरीच लग्न लागल या धास्तीनं त्यांच्या उरांत धडकी भरली ! पण दारात येऊन पाहातात तों मास्तर उभे असलेले बघून त्या दोघीनीहि राधिकेवर एकदम झडप घातली. " बाई माजी नशिबवान ! काळीज फाटून गेल वत धरणी ठाव देत न्हवती." आणि त्यांनी तिच्या अगाखाद्यावरून हात फिरवला. तसं करतांना राधिकेच्या हातात चुडा भरल्याचं ध्यानांत येतांच शेवंती आक्का क्षणभर दचकल्या. भांबावून जात त्यांनीं मास्तरांच्याकडे पाहिलं आणि राधिकेच्या गळ्यांत चांचपलं ! त्यामुळं एवढा वेळ गप्प बसलेली राधिका म्हणाली, " चुडा भरला तुझ्या नवऱ्यानं आत्याबाई आपली सून करावी म्हणून ! पण . .पण ह्यांनीं ऐन वेळेला माझी सुटका करून इथं आणली ! "

" मास्तर ! आजपसन तुमी आमचं जावाय झालासा ! " आजोबांनीं राधिकेचा खुलासा ऐकतांच मास्तरांना आपल्याजवळ ओढून घेतलं; पण त्यामुळ भुलून न जाता मास्तर थोडया कठोरतेनच म्हणाले, " माझी तशी मुळीच इच्छा नाही ! राधिकेला सहीसलामत सोडवून आणून घरी पोचवणं एवढंच माझ काम. मी गरीब माणूस ! मी चाललो माझहि काळीज चागल शाबूद आहे अजून ! " आणि खरोखरच त्यानी पाऊल उचललं; पण आजोबानी पुन्हा त्याचा हात धरून थोडया वरच्या आवाजात म्हटलं, " माज्या पोरीन ह्यो हिरवा चुडा भरलाय् त्यो काय तुमास्नी मागारीं घालवायला ? बसा गुमान हित ! आत्ताच्या आत्ता गावात अक्षीता दिऊन येतों तुमच्या लग्नाच्या " आणि मास्तराना खाली बसवून ते बाहेर जायला निघणार इतक्यात श्रीपती आणि झेल्या घरात शिरले. राधिकेला पहाताच श्रीपती एकदम पुढ झाला आणि त्यान तिला कडकडून मिठी मारली. झेल्यान एकवार हसून राधिकेकडे पाहिल आणि आपल्या मास्तराना बिलगीत तो म्हणाला, " किती शोधायच ह्रो तुम्हांला ? आणि मला सोडून लग्न केलत ना आक्काशी ? "

त्यावर आजोबाच म्हणाले, "केल न्हाई. आता करनार हाईती ! न्हवरीचा चुडा दिकून भरून झाला आता भटजी याचाच अवकाश ! चटदिशी उरक् या लगीन; न्हाई तर त्यो इटचा–" आणि बोलतां बोलताच अडखळले. तेव्हां झेल्या म्हणाला, " ह ! त्याची नको काळजी. त्यांचा तो मुलगा आमी धरून ठेवलाय् ! इथ गांवांत सुद्धा आणलाय ! आणि त्यनाही असच जमून टाकलय् एका ठिकाणी. खुशाल येऊ द्या आता कोण वाटेल ते ! "

" खरच ? " आजोबाच्या सुरकुतलेल्या गालावर हसू उजळल आणि मोठ्या आनंदानं झाल गेल ते सार विसरून राधिकेला पोटाशी धरीत ते म्हणाले, " पोरी, आजपातूर तुला लई तरास दिला. न्हाई न्हाई त्ये हालवनवास भोगलास ! आमचं नशीब म्हन ह्येनी तुला हुडकून आनली, आन तुजंबी न् आमचं नशीब दांडग म्हन ह्ये जावाय बी आमास्नी मिळालं."

आणि ते ऐकून खाली मान घातलेल्या राधिकेची हनुवटी हळूच वर करीत शेवतीआक्काहि म्हणाल्या, " पोरीची माज्या दिस्ट काडू दे आदी. चुडा

भरून रानावनांतून आलीया! दिस्ट बिस्ट हुयाची गऽऽ बाई मेल्याची त्या"
आणि त्यांनीं कमळाबाईला आंत चलायची खूण डोळ्यानी करीत राधिकेला घरांत नेली. त्यामुळं झेल्या आपल्या मास्तराना म्हणाला, "मास्तर, तुम्ही चला आमच्या घरी."

"मजी? लगीन झाल्याबिगारच?" आजोबानी झेल्यावर एवढाला एकेक डोळा केला आणि मास्तर गरीब असले तरी कुलवान आहेत या आनदात ते मुहूर्त ठरवायला म्हणून घराबाहेर पडले. इतक्यात धावत पळत जाऊन श्रीपतीन बोलावून आणलेल्या सनईवाल्यान त्याच घरदार एकदम मंगलस्वरानी घुमवून टाकायला आरभ केला

"हे काय भलतंच?" मास्तरानी अजूनहि आपल्या मनाचा तोल सुटू दिला नाही त्यांनी गरीब म्हणून आपणाला हिणवलेल्या ह्या माणसाना सरळ सरळ हा सवाल टाकला श्रीपतीन मान खाली घातली आणि एवढच म्हटल,

"डोगराएवढ नशीब माज्या पोरीचं! लाक चुका केल्या असतील्या आमी; पर तुमी त्या पदरात घ्याला पाहिजेत! शिकल्याली मानस तुमी. आबाळाएवड कांळीज असतया म्हन तुमच!" आणि त्यान मास्तरांचे पाय पाय धरले, इतक्यात शेवतीआक्का एक मणी मगळसूत्र हातात घेऊन आणि राधिकेला पुढं करून मास्तराना म्हणाली, "आदी हे हिच्या गळ्यात बादा तुमी! येळ वकूत सागून येत न्हाई. माज्या गळ्याची आन हाय तुमास्नी! माज्या डोळ्यानं बगू दे एकडाव" आणि तिन मास्तरांच्या हातावर ती काळी पोत ठेवली; पण मास्तरांनी त्या म्हणतात म्हणून ती पोत राधिकेच्या गळ्यात न बाधता त्यांना विचारलं, "आणि तुमचा नवरा नको म्हणाला व तुमचहि मन पुन्हा वदललं तर?"

त्यावर करारीपणानं सांगावं तसं शेवंतीआक्कानी त्याना सागून टाकलं, "त्येचं नांव नग आता! त्यो मला आन् मी त्येला आता कायमची मेलों. आमच्यासाठी नसल, पर हिच्यासाठी तरी तुमी हे ऐकलच पाहिजे. या उप्पर तुमची मर्जी!" आणि त्या चटकन् आत निघून गेल्या. श्रीपती आणि कमळा-बाईहि त्यांच्या मागोमाग आत गेलीच. झेल्याला सगळीं घरांत गेलेली बघून

बरं वाटलं. तो मास्तरांना मिठी मारीत ओरडला, " मास्तर, खरंच आक्का-संग लग्न करा तुम्ही ! मी कायमचा राहीन तुमच्या दोघाच्या बरोबर. मला तुम्ही दोघेहि फार फार आवडता ! "

त्यावर मास्तर नुसते हंसले. झेल्याच्या केसातून बोटें फिरवीत त्यांनी त्याला कुरवाळलं आणि त्यांनीं राधिकेकडे पाहिलं. त्या वेळी तिनं खालीं मान घातली होती ती आपल्याच नादांत होती शकुंतलेच्या आठवणीनं तिच्या मनात गर्दी केली होती तिचं लग्न ठरलं तेव्हाची तिच्या मनाची उडालेली धादल तिला आठवत होती. तिच्या लग्नाला जातां आलं नाही म्हणून नाराज झालेलं तिचं मन या वेळी ती जवळ नाही म्हणून अधिक खट्टू झालं होतं.

राधिकेनं मान वर केली मास्तरांची आणि तिची अचानक नजरभेट झाली त्यामुळं ती इतकी लाजून चूर झाली की, त्याच्या समोर येऊन उभ्या राहिलेल्या आजोबांचं की घरात वाजत असलेल्या सनईचंहि तिला भान राहिलं नाही



